होळकर सरकार ग्रंथमाला

पुस्तक चौथें

# कमलेचीं पत्रें.



लेखक—

नारायण कृष्ण वैद्य, इंदूर.

प्रकाशक—

मध्यभारत एजन्सी, इंदूर.

सन १९१९

किंमत १० आणे.

हें पुस्तक
नारायण कृ. वैद्य,
यांनीं मध्यभारत एजन्सीकरितां,
इंदूर येथें प्रसिद्ध केलें.





प्रिंटर:—
अनंत आत्माराम मोरमकर,
श्रीलक्ष्मीनारायण प्रेस,
४०२, ठाकुरद्वार,
मुंबई, नं. २.

श्रीमंत

सौभाग्यवती महाराणी चंद्रावती बाईसाहेब

यांचे सेवेशीं

त्यांची निर्मल व साधी राहणी, प्रजावात्सल्य, नैसार्गिक

ओजास्विता, सनातन-धर्म-निष्ठा इत्यादि

# देवी श्री अहल्याबाई

यांची आठवण करून देणाऱ्या गुणांबद्दल

ही

अल्पशी कृती

परवानगीनें अर्पण केली आहे.

श्रीमंतांच्या नम्र प्रजाजनांपैकीं

एक

ना० कृ० वैद्य.

# आभार प्रदर्शन.

ह्या पुस्तकाच्या कामांत मला अनेक जणांचें साह्य झालें आहे. केवळ नामोच्चार करून त्यांच्या ऋणांतून उत्तीर्ण होणें अशक्य आहे. असें जरी आहे तथापि ज्या प्रभूच्या शीतल छायेंत मराठी साहित्याची ही अल्प सेवा करण्याची मला सुसंधी मिळाली व ज्यांच्या औदार्यामुळें ' महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक मंडळा'च्याद्वारें मिळालेल्या साह्यामुळें ही अल्प कृति मराठी वाचकांसमोर मांडणें शक्य झालें, त्या आमच्या दयाळू **श्रीमंत महाराजाधिराज राजेश्वर सवाई तुकोजीराव होळकर** महाराजांचा मी किती कृतज्ञ आहें हें शब्दांनीं व्यक्त करणें शक्य नाहीं.

**श्रीमंत सौ० चंद्रावति महाराणीसाहेब** यांनीं ही अल्प कृति अर्पण करण्याची परवानगी देऊन त्यांच्या विषयींची पूज्य निष्ठा व्यक्त करण्याची जी मला सुसंधी दिली तिजबद्दल त्यांचा मी अत्यंत ऋणी आहें.

त्याचप्रमाणें **श्रीमन्महाराणी साहेब कुचबिहार** यांनीं माझ्या नम्र विनंतीला मान देऊन आपल्या प्रास्ताविक लेखानें या पुस्तकाला भूषित करण्यांत जें औदार्य दाखविलें त्याबद्दल त्यांचाही मी ऋणी आहें.

श्रीमंत सरदार **सदाशिवराव खासे साहेब पवार** ( देवास), होम मिनिस्टर ग्वालियर स्टेट, यांनींही वेळोवेळीं मला जें प्रोत्साहन दिलें त्याबद्दल त्यांचेही आदरपूर्वक आभार मानणें हें माझें कर्तव्य आहे.

सरतेशेवटीं कोणत्याही सत्कार्याला सहाय्य करण्यास सदैव तत्पर अशा परमपूज्य **वहिनीसाहेब** ( श्रीमति रमाबाई रानडे ) यांनीं पुस्तकाचा "परिचय" करून देण्याकडे आपला अमोल वेळ खर्च केला त्याबद्दल त्यांचेही मनःपूर्वक आभार मानून वाचकांची रजा घेतों.

जुना तोफखाना
इंदूर १९-११-१८

**ना. कृ. वैद्य.**

## श्रीमंत सौ० महाराणी साहेब कुचबिहार यांची

# प्रस्तावना.

राष्ट्रांतील ललितकला, साहित्य, संगीत किंवा काव्य हीं त्यांत वास करणाऱ्या लोकांचा आत्माच होत. व्यक्तींच्या अंतःकरणांत उद्भूत होणाऱ्या मनोवृत्तींचें यथार्थ चित्र कुंचलीनें चित्रफलकावर रंगविणारा–चित्रकार, संगमरवरी पाषाण शिलेंतून आपल्या टांकीच्या जोरावर दैवी भाव प्रगट करणाऱ्या मूर्तीला निर्माण करणारा मूर्तिकार, कुंचली ऐवजीं त्याच मनोवृत्तींचा बोध करून देणारा शब्द-सृष्टीचा ईश्वर, कवि किंवा प्रतिभासंपन्न साहित्यलेखक, आपल्या अभिनय नैपुण्यानें जनमन रंजविणारा कुशल नट, भिन्न भिन्न मधुर, कोमल अशा स्वरयोजनेनें हृदयवाद्यांतील तारांत कंप उत्पन्न करणारा वस्ताद तंतुवाद्यकार, हे सर्वजण आपल्या योजनाचातुर्यानें, व कल्पकतेनें त्या त्या राष्ट्रांतील गूढ भावनांचे खेळ व्यक्त करितात. त्यांत राष्ट्रीय संस्कृतीच्या स्वरूपाचें खरें मर्म प्रतिबिंबित झालेलें असतें. चिकित्सक व मार्मिक वाचक त्या रमणीय कृतीकडे अशाच दृष्टीनें पाहतो, व त्यापासून मिळणाऱ्या आनंदाचा स्वतः उपभोग घेऊन इतरांनाहीं तो आपला अंशभाक् बनवितो. परंतु अशा प्रकारें राष्ट्रसंस्कृतींचें ध्येय पूर्णपणें प्रतिबिंबित करण्याचें सामर्थ्य मात्र फारच थोड्या व्यास, वाल्मिकी, कालिदास, शेक्सपीअर, मोलीयर, मायकेल एंजेलो, गॅरिक रेफेल, किंवा तानसेन या सारख्या प्रतिभाशाली विभूतींच्या अंगीं कमी जास्त मानानें आढळून येतें.

परंतु अशा श्रेष्ठ सामर्थ्याच्या व्यक्ती सदैव निर्माण होणें शक्य नाहीं. अनंत कालच्या फेऱ्यांत त्या मधून मधून दृग्गोचर होतात व

इतरांना मार्गदर्शक होतात. तथापि भरतींच्या वेळची अत्युच्च लाट येण्यापूर्वी तिला पोषक लहान मोठ्या अशा लाटा निर्माण होतच असतात. हा चमत्कार जसा भौतिक सृष्टींत दिसून येतो तसाच प्रकार मानसिक सृष्टींतही घडत असतो. हिंदुस्थानांतील देशी भाषांच्या साहित्योदधीवर आपटे, विष्णुशास्त्री, मायकेल मधुसूदन, बंकिम, रवींद्रनाथ यां सारखे कमी अधिक उच्चतेचें तरंग जे दृष्टीगोचर होऊं लागले आहेत ते या गोष्टीचेच द्योतक होत.

या पुस्तकाला आधारभूत घेतलेला मूळचा आर. वेंकट सुब्बाराव यांचा ' Kamla's Letters to her Husbund ' हा ग्रंथ यद्यपि इंग्रेजी भाषेंत लिहिलेला असला तरी त्यांत आर्यसंस्कृति, व तिला अनुकूल किंवा पोषक अशी विचारपरंपराच त्यांत व्यक्त झालेली आहे. प्रस्तुत ग्रंथाला जरी अग्रपूजेचा मान न देतां आला तरी ग्रंथकाराच्या हृदयंगम लेखनशैलीबद्दल व मनुष्यस्वभावांतील मर्म ओळखून त्याचें हुबेहुब चित्र वाचकांच्या नजरेसमोर मांडण्याची विलक्षण हातोटी साधल्याबद्दल त्याची लंडन टाइम्स् वेस्टमिनिस्टर गॅझेट प्रभृति विलायती व इंग्लिमन, मद्रासमेल किंवा हिंदूसारख्या या देशांतल्या अधिकारी व मार्मिक टीकाकारांनीं पाठ थोपटली आहे. या पुस्तकांत आर्यसमाजस्थितीचें व संस्कृतीचें प्रतिबिंब उमटलेलें आहे. पुस्तक वाचीत असतां त्यांतील आमच्या विवाहपद्धतीचें, स्त्रियांच्या मानसिक औदार्याचे किंवा विकारवशतेचे, सुधारणेचें सोंग पांघरून तिच्या नांवाखालीं स्वैराचार चालवूं पाहाणाऱ्या व्यक्तींच्या विचित्र लीलांचे, भूतदयेचा वरपांगीं आव घालून केवळ आपल्या मनोवासना पुरविण्याची धडपड करणाऱ्या समाजांतील कांहीं प्रतिष्ठित मूर्तींचे, समायिक व विभक्त कुटुंबपद्धतींतील गुणदोषोद्घाटनाचे—बहुविध चित्रपट वाचकांच्या चित्तचक्षूपुढून जाऊन त्यांच्या

यथार्थ दर्शनानें, त्यांच्या मनांत ग्रंथकाराविषयीं कौतुक उत्पन्न झाल्या-खेरीज राहणार नाहीं.

मूळ ग्रंथांतील विचार प्रगट झाल्याला २० वर्षें होऊन गेलीं. त्यामुळें आजला जरी त्यांत नाविन्य राहिलें नसलें तरी त्यांचें महत्त्व तसेंच कायम आहे. हिंदुसमाजासारख्या पुरातन संस्थेला नवीन पायावर बसवूं पाहाणारांनीं पाश्चात्यांची विचारसरणी लागू करतांना उभय समाजांतील असलेला फरक व विशेषतः त्यांतील मूलध्येयविषयक भिन्नता ही पूर्णपणें लक्ष्यांत घेऊनच जें काय करावयाचें असेल तें करावें. ह्या मुख्य सिद्धांताचें महत्व आजलाही तितकेंच आहे.

बहुजनसमाजाला पचेल व रुचेल अशा प्रकारची विचारशील पण मोहक अशी या पुस्तकाची मांडणी असल्यानें आगंतुक विदेशी पोषाख टाकून मूळच्या आपल्या स्वभावाला साजेसा देशी वेष घेतलेली ही कमला महाराष्ट्रांतील सहृदय वाचकांचें मनरंजन करण्यास समर्थ होईल असें आम्हास वाटतें. सामान्य जनसमूहाला तार्किक पद्धतीचे, किंवा गंभीर पण रुक्ष अशा भाषेंत लिहिलेले ग्रंथ इतके आवडत नाहींत. त्यांना प्रस्तुत ग्रंथासारख्या पद्धतीचे शर्करावगुंठित, व चित्ता-कर्षक ग्रंथ हवे असतात. अशा दिशेनें रा. वैद्य यांचा हा प्रयत्न अभिनंदनीय असून त्याचें महाराष्ट्रांतील रसज्ञ वाचक चीज करतील असा आम्हांस पक्का भरंवसा आहे.

आपल्या भर्त्याच्या ठिकाणीं कमलेचें इतके अकृत्रिम व जाज्वल्य प्रेम असतांना शेवटीं तिच्या जीविताचें पर्यवसान ह्याप्रमाणें शोक-पर्यवसायी झालेलें पाहून जीविताच्या चंचलतेविषयीं अनेक तरंग येऊन वृत्ति खिन्न झाल्यावांचून राहात नाहींत. किंबहुना तिच्या त्या निरतिशय प्रेमामुळेंच मनांतल्या सूक्ष्म किल्मिषाचें स्वरूप वाढतां वाढतां शेवटीं कोणत्या थरावर गेलें व तशा स्थितींत सांपडलेल्या

मनुष्याला वेड लागणें किती साहजिक आहे याचा प्रत्यय प्रत्येक वाचकाला आपल्या आयुष्यांतील पूर्वानुभवावरून येणारा आहे. वीणेची कोमल सुर लावलेली तार जास्त जोराचा आघात होतांक्षणींच ज्याप्रमाणें ताडकन् तुटते, किंवा जलतरंगांतील पेल्यावर होणारे आघात प्रमाणांत आहेत तोंवर आनंददायक असून त्यांतील काडीचा ठोका प्रमाणाबाहेर पडतांच ज्याप्रमाणें तो पेला कलंडून रसाचा सारा विरस होतो, त्याचप्रमाणें त्या शुद्ध अंतःकरणाच्या व कोमल मनोवृत्तीच्या आर्य स्त्रीच्या मनाची स्थिति झाली. इतक्या कोमल अंतःकरणाच्या व्यक्ती फार थोड्या असतात किंवा संसारांत प्रायः असे प्रसंग विरळ येतात व याच कारणामुळें पुष्कळांना चरित्रनायिकेच्या वेडाचें एवढें गूढ पडतें.

एकंदरीत पाहताना या पुस्तकाच्या वाचनानें एक विशेष परिणाम वाचकांच्या मनावर राहतो. व तो विख्यात आंग्ल कवि टेनिसन ह्यानें म्हटल्याप्रमाणें.

Women's Cause is Men's,
They rise or sink together;
Dwarf or godlike, bound or free.

स्त्रीपुरुषांच्या हितैक्याबद्दलची विचारजागृति होणें हा होय.

अशा मनःस्थितींतच वाचकांस जास्त विचार करण्यास मोकळें सोडणें बरें.

---

# प्रस्तावना.



" कमलेचीं आपल्या नवऱ्याला गेलेलीं पत्रें " या नांवाचें पुस्तक रा. रा. नारायणराव वैद्य यांनीं तयार केलेलें इकडे पाहण्यास पाठविलें. तें सर्व वाचून पाहिलें. हें पुस्तक इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर असून, भाषांतर फार चांगलें वठलें आहे. कमलेची भाषा गोड, मर्यादशील व सुशिक्षिणाचा परिणाम जिच्यावर घडला आहे अशी आहे आणि त्यांत निस्पृहपणाही आहे. आपल्या पतीला अनुलक्षून तिनें ज्या बहुमानाच्या शब्दसरणीची योजना केली आहे, ती वाचणाराला फारच चांगली वाटते; व त्यामुळेंच कमलेबद्दल अधिक आदर वाटतो. ज्या पद्धतीला अगर शब्दप्रयोगाला एका काळीं विशेष मान दिला जात होता, त्याच योजनेला हल्लींच्या दृष्टीनें तितकी विशेष किंमत दिली जात नाहीं. शिक्षण अधिक वाढल्यापासून गेल्या १०।१५ वर्षांत यांत बराच बदल झाला आहे. आतांची समजूत अशी आहे कीं, पुरुषांनीं बायकोला खुशाल लोकांच्या देखत सुद्धां ' अग ' ' जाग ' ह्मणावें, आणि बायकोनें मात्र तोंडावर तर नाहींच, पण पाठीमागें नुसतें ' अहो ' ' जाहो ' सुद्धां ह्मणावयाचें नाहीं; अशी वेडगळ व अपमानाची चाल आह्मांस नको आहे. पतिपत्नीचे हक्क सारखेच आहेत; तेव्हां आह्मी बरोबरीच्या मैत्रिणीसारख्याच त्यांच्याशीं वागणार, व तेंच आह्मांस पसंत वाटतें; हें हल्लींच्या मुलींचें अगर मुलांचें ह्मणणें इष्ट आहे कीं नाहीं, हा निराळा विचार आहे. पण ज्या परिस्थितींत मनुष्य वाढलेलें असतें, त्या परिस्थितीचा व काळाचा परिणाम न समजतां आपोआप त्या वेळच्या मनुष्यावर होणारच. अगदीं न होणें हें अपरिहार्य आहे. हाच प्रकार मागील पिढीचा असल्यामुळें त्यांना हें पुस्तक विशेष आवडेल यांत शंका नाहीं.

जगाची प्रगति एकसारखी होत आहे, मग त्यामध्यें राहणाऱ्या मनुष्यांची प्रगति कशी होणार नाहीं ? होणारच. व काळाप्रमाणेंच त्यांच्याही आचारविचारांत बदल पडणारच. हल्लींच पहा ना. तीसचाळीस वर्षांच्या पूर्वी जे दागदागिने, भांडींकुंडीं, वाहनें, वस्त्रप्रावरणें वगैरे वस्तूंबद्दल लोकांना विशेष आवड वाटत होती, तेच जिन्नस आज out of fashion ( जुनेपुराणे ) झाले ह्मणून लोक मोडून नव्या तऱ्हेचे बनवूं लागले आहेत. असें जरी असलें तरी स्त्रीस्वभावाचा जो विशेष ह्मणजे मर्यादा, कोमलता, दया, व धार्मिक भावना ह्यांची कोणत्याही काळांत जोपासना झालीच पाहिजे. या भावना—हा विशेष—आपल्यांतून केव्हांही जाऊं न देणें हें सर्वस्वीं इष्ट आहे, असें माझें मत आहे.

कमळेचें आपल्या पतीवरील निस्सीम प्रेम, त्याला लिहिलेल्या पत्रांत वापरलेली भाषा, कोणालाही गोड, मर्यादशील व प्रेमळ वाटावी व ह्मणूनच ती जास्त आवडावी, हें अगदीं बरोबर आहे. कमळेचें आपल्या दुःखी मैत्रिणीशीं निष्कपट व शुद्ध प्रेमानें वागणें, आपमतलबी लोकांबद्दल निर्भीड व स्पष्ट मत, बायकोच्या कल्पनाखोर, भोळ्या व भित्र्या स्वभावाला अनुसरून स्वप्नावर विश्वास, त्याबद्दल मनाला सारखी रुखरुख व काळजी लावून घेणें, हे सर्व स्त्रीस्वभावाला नैसर्गिक असणारे गुण तिजमध्यें पुष्कळ अंशानें वास करीत आहेत, असें दाखविलें आहे. कमळा चांगली सुशिक्षित असून शिक्षणामुळें सुद्धां मूळ स्वभाव अजिबात सोडूं ह्मटल्यानें सुटत नाहीं; ही गोष्ट कमळेच्या उदाहरणावरून चांगली सिद्ध होते. कमळेचा पापभीरूपणा, सत्यनिष्ठा व दया हीं तिच्या सुशीलतेची साक्ष पटवितात. कमळेला नवीन तऱ्हेचें शिक्षण व वळण मिळालेलें असून तिचें पतीवरील प्रेम व भक्ति खऱ्या हिंदू कन्येला

शोभेल असेंच आहे. ह्मणून तिच्याबद्दल वाचणाराचा एक प्रकारचा आदर अधिक वाढतो.

एकंदरींत रा. नारायणराव वैद्य यांनीं केलेलें भाषांतर केवळ शब्दशः भाषांतर नसून कांहीं ठिकाणीं मराठी चालीरीतींला अनुसरून चांगलें दिसेल, असा कांहीं कांहीं वाक्यांत फरक केला आहे; तो अधिक चांगला झाला आहे. भाषा साधी, सुबोध, गोड व प्रौढ अशी वापरली आहे. रा. वैद्य यांनीं इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर करून सुमारें तीस चाळीस वर्षांपूर्वींचें हें एक शब्दचित्र पुस्तकरूपानें काढलें आहे व मराठी वाचकांना ही एक बहुमोल देणगीच दिली आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. हें पुस्तक महाराष्ट्रीय वाचकांना व विशेषतः स्त्रीवर्गाला आवडो, व रा. वैद्य यांनीं घेतलेल्या श्रमांचें चीज होवो, असें मी इच्छितें.

५९१, सदाशिव पेठ, पुणें,
ता. १० नोव्हेंबर १९१८.

**रमाबाई रानडे.**

---

# अनुक्रमणिका.



# कमलेचीं आपल्या नवऱ्याला गेलेलीं पत्रें.

## पत्र १ लें

### अपशकुन.

स्वारीला पोहोंचवून आल्याला काय त्या साऱ्या दोनच घटका झाल्या असतील. पण प्राणेश्वरा, तेवढ्याच वेळांत कित्ती अपशकून झाले ते! तिकडनं परतलें तेव्हां सूर्य मावळायची वेळ. त्या वेळचा तो मजेदार देखावा पाहून मीं कांहीं बोललें तर ह्मणायचं कीं, 'तूं जन्मतःच कवि झालेली आहेस ह्मणून. याच्या जोडीला तूं चित्र काढायलाही शिकली असतीस तर किती चांगलं झालं असतं! असो ह्मणा. रंगचित्र न काढतां आलं ह्मणून काय झालं? शब्दचित्र काढण्यांत तर तूं कुशल आहेस ना?' एखाद्याला हरभऱ्याच्या झाडावर कसं चढवावं हें तिकडे चांगलं साधलं आहे. पण प्रियकरा, काल माझं चित्त ठिकाणावर नसल्यानं ह्मणा किंवा कशानंही ह्मणा पण संध्याकाळचा तो देखावा पाहून माझ्या मनांत निराळ्याच कल्पना यायला लागल्या! म्हणतात ना कीं, 'मनच तारी मनच मारी' तें अगदीं खरं आहे. मला असं

वाटलं कीं जसा कांहीं सूर्यनारायण आपल्या या दीन स्थितीकडे पाहून मनांतल्या मनांत हंसतोच आहे ! 'परदुःख शीतळ असतें' त्यामुळें दुसऱ्याला थट्टेनं हंसायला काय होतं ? बरं, एवढ्यानंच झालं का ? नाहीं. तो आपला काळा बट कशानं असेल तें असो, एकाएकीं इतका बेफाम झाला कीं कांहीं केल्या आवरेचना. आपला लगाम तोडलान्, दुगाण्या झाडून गाडीच्या बंबाला जाय्या केलंन्, आणि गाडी घेऊन भरधांव पळायला सुरुवात केलीन्; त्यांत धक्क्यानं मी कांहीं अंतरावर जाऊन आदळलें. विशेषशी दुखापत जरी झाली नाहीं, तरी त्या वेळेला मला असंच वाटलं कीं भरलीं आपलीं पुरीं शंभर वर्सं. पण छे ! तसं कुठलं व्हायला ? अजून जगांत खस्ता खायच्या आहेत त्या ! कशीबशी घरीं येऊन पोहोंचलें. इथें येतें तों उंबऱ्यांतच मेलं सत्यानाशी मांजर तय्यार ! आणि याच्यावर कडी म्हटली म्हणजे घरांत पाउल टाकल्यापासनं कुण्णानं माझ्याकडे ढुंकून दिखील पाहिलं नाहीं मग बोलणं तर दूरच. खरंच, गडे ! सांगावं. अशान माझ्या अंगांत राहील का कांहीं तकवा !

हवं तर तिकडनं, याला देवाधर्माचं वेड—किंवा भोळसटपण-म्हणून नांव द्यायचं. पण या गोष्टी मनाला अगदीं लागल्या खऱ्या ! आणि ही जी मर्माला झालेली जखम ती बरी करायला तिकडच्या शिवाय दुसरा धन्वंतरी कुठला मिळायला? अन् स्वतःचं सान्निध्य मिळालं तर मग मात्र प्रकृती ताबडतोब ताळ्यावर येईल ! पण तसं कुठलं व्हायला ? क्षणोक्षणीं आपल्या दोघांमधलं अंतर सारखं वाढतं आहे. राहून राहून मनांत असं येतं कीं जों

आपलीं दोघांचीं मनं इतकीं जुळलेलीं—एकजीव झालेलीं—आहेत त्यांत कधीं तरी फरक पडेल काय ? ह्या गोष्टीची कल्पना देखील असह्य होते. असले विचार मनांत आले कीं पोटांत कसं धस्स होतं !

पाहा ! पाहा ! लबाड कुठला ! गुलामानं आतां जसा कांहीं बाजार भरविला आहे ! अन् मी आलें तेव्हां तोंडाला जशी खीळ घातलेली. कोणी ह्मणेल जसा कांहीं याच्यांत जीवच नाहीं. गप बस मेल्या चावटा ! तुझा जीव जर तुला प्यारा असेल तर आधीं गप बस कसा ! ह्मणतो कसा—"कमल—लाडके—लाडके कमले"—मला आपलं वाटलं कीं स्वारीचं येणं झालं ह्मणून. पदर बिदर सावरून मी जागची उठलें दिखील कडी काढायला पण-!

प्राणेश्वरा, खरंच, मला एकटीला, इथें असं सोडून कसं जाणं झालं बरं ? मागच्या जन्मींचं माझं कांहीं पाप तर उभं राहिलं नसेल ना ? भीती ! केवळ भीती ! देवा नारायणा, माझ्या अंतःकरणांत केवढी कालवाकालव होऊन राहिली आहे हें पाहायला तुलाच तेवढे डोळे आहेत.

आपली,

कमला.





# पत्र २ रें.



## पक्ष्याचा आचरटपणा.

प्रियकरा, काल रात्रीं मीं तंद्रींत काय लिहिलं तें माझं मलाच कांहीं सारं आठवत नाहीं. परंतु मला आतां असं वाटायला लागलं कीं तें लिहिलं नसतं तर बरं झालं असतं. मनाची सारखी तळमळ सुरू होती. त्यांतच माझा डोळा लागला. पहाटला जागं झाल्यावर जिवाला अंमळ तकवा आला. पहाटच्या त्या गार वाऱ्यानं मनाला हुशारी वाटली. त्यांत इकडच्या नांवाचा गजर कानीं पडल्यानं तर मन आनंदानं उचंबळून गेलं. पाहतें तो आपला कृष्णा ! त्या पाखराजवळ गेलें अन् त्याला त्याच्या त्या कैदखान्यांतनं मोकळं सोडलं. त्याच्या पाठीवरनं हात फिरविला. आणि त्याच्या त्या कामगिरीबद्दल प्रेमानं दोन पापें घेतले. काल रागाच्या भरांत त्याला शिव्या मिळाल्या त्याचा राग घालवायासाठीं म्हणून त्याचा आणखी एक मुका घेतला. पण तो कसला चमत्कारिक-त्या आचरटानं माझ्या गालाचा आणि ओठाचा कडकडून चावा घेतला. तो इतक्या जोरानं कीं मला वाटलं कीं इकडच्या जाण्याची वर्दी गुलामाला आधींच मिळाली असली पाहिजे. आपलं—एरवींच—विचारतें. माझ्या लाडक्याचा—तिकडचं नांव असलेल्याचा घुस्सा तर नाहीं ना यायचा ?

या वेळीं दिवस चांगला वर आला आहे. रात्रीच्या त्या काळ्या कुट्ट अंधारांत मनांत ज्या नाना शंका कुशंका उठतात त्या सकाळला सूर्याच्या स्वच्छ प्रकाशांत पार वितळून नाहींशा होतात ! माझ्या एकंदर वृत्तींतही विलक्षण फरक पडलेला आहे. एका सूर्याच्या उजेडानं माणसाच्या वृत्तींतही किती विलक्षण फरक पडतो तो ! उठतां क्षणींच आज सकाळीं जे मला शुभ शकून झाले त्यांचा पडताळा मला लागलीच आला. नवाच्या आधींच डाकवाल्यानं मला तिकडचं पत्र आणून दिलं. किती पण प्रेमळ पत्र असायचं तें. चालता चालतां गाडींतल्या गाडींतच लिहिलं असल्यामुळं त्यांतले ते फरफाटे, अन् तें कापऱ्या हाताचं लिहिणं,—पण मला कीं नाहीं ते तसंच लिहिलेलं पत्र भारी आवडलं. अन् तें तेवढ्याच कारणास्तव.

प्राणेश्वरा, खरंच, आपल्या उपदेशाप्रमाणें मला वागायला हवं—अन् त्याप्रमाणें वागायची मी माझ्याकडनं होईल तितकी शिकस्तही करीन. पण मी पडलं बायकोमाणूस— केवळ पोरसवदा (तिकडचंच ह्मणणें तें). स्वतः गुरुजी जवळ असल्याशिवाय कोणत्या मुलीला एकटीलाच धडे तयार करतां येतील ? अन् त्यांत ते प्रेमाचे धडे. पण कसंही जरी असलं तरी मला तिकडच्या वचनावर विश्वास ठेवलाच पाहिजे. कारण, वेगळं—स्वतःला सोडून दूर राहणं मला कितीही नावडतं असलं तरी काळवेळ पाहून तिकडून जें ठरवायचं तें चांगलंच असणार अशी माझी खात्री आहे.

'काय ती एका वर्षाची गोष्ट' 'साधल्यास तशा अधून मधून उभयतांच्या गांठी पडतीलचं ह्मणा,' 'येथें उकडतं तरी

किती,' 'तुझ्यासारख्या नाजुक प्रकृतीच्या मुलीला तर इथली हवा मुळींच मानावयाची नाहीं'–हें पाहा, किनई, त्या वेळीं कारणं सांगायचीं झालीं तीं मनाला पटलीं. ( केवढी जबरदस्त मोहिनी घातलेली माझ्यावर ! ). पण आतां मात्र कांहीं ती मात्रा लागू पडायची नाहीं हो ! आतां शब्दांना मान द्यायचा ह्मणजे तो बायकांचा धर्म ह्मणून. तिकडची आज्ञा पालन करायची ह्मणून. तिकडचा संतोष राखायचा एवढ्याच साठीं !

मी जी, माहेरीं, आईबापांजवळ येऊन राहिलें ती केवळ इकडंची आज्ञा ह्मणून; इकडून जसं लिहिणं झालं तसं ह्मणजे, 'त्यांचा संतोष राखण्यासाठीं' नव्हे कांहीं. आई व बाबा यांजवर माझी माया आहे आणि ते मला जवळचे जिव्हाळ्याचे वाटतात. हेंही मला कबूल. पण इकडचा जिव्हाळा मात्र त्याच्याही वरचा आणि ही इतकी जबरदस्त मोहिनी घातली काय ती साऱ्या दोन वर्षांच्या अवधींत !

प्रियकरा, मला सांगायचं झालं कीं, आपलं मन आवरून धर, रोज पत्र टाकीत जा अन् जी जी ह्मणून कांहीं गोष्ट घडेल तिची मला हकीगत लिहून कळीव. पण माझं हें वहकलेलं मन आवरतां आवरत नाहीं याला मी तरी काय करूं ? याकरितां हें पत्र मी येथेंच संपवितें. अन् क्षणभर हातीं वीणा घेऊन पाहतें, त्यानं तरी मनाला कांहीं विरंगुळा पडला तर !

आपली,

कमला.





# पत्र ३ रें.



## घरची पिरपिर !

प्राणेश्वरा,—सोमवारपासनं मी कांहीं हातांत लेखणी धरली नाहीं.—कां बरं ?—येईल सांगतां ? आज दिखील आर्धी पत्र लिहायला बसायचा विचार नव्हताच; पण तो शेवटीं बदलावा लागला. कारण त्यापासनं व्हायचं काय ? स्वतःच्या मनाला मनस्वी ताप व्हायचा आणखी कांहीं नाहीं ! हें माझ्याच्यानं कसं बरं सोसवेल ? जीवितेश्वरा, कधीं तरी मी स्वतःच्या आज्ञे-बाहेर जाईन काय ? छे ! छे ! अशी कल्पना देखील मनांत येऊं देऊं नका ! माझ्या हातून आजपर्यंत अशी गोष्ट घडली नाहीं व यापुढेंही ती कधीं घडणार नाहीं. जें जें कांहीं ह्मणून सांगायचं होईल तें सारं पाळणं हें माझं कर्तव्य आहे. खरं ह्मटलं तर इक-डचा संतोष राखणं हाच माझ्या सुखाचा कळस ! आणि स्वतःचं मन राखायचं ह्मणजे तिकडून झालेली आज्ञा प्रमाण मानायची. पण कितीही केलं तरी पुरुषासारखं थोडंच बायकांना साधणार आहे ! अर्धमुर्ध साधलं तरी मिळाविली ह्मणायची.

गेल्या चार दिवसांत चार पत्रें गेलीं असतीं— आजचें पत्र हें पांचवं—विचार बदलला नसता तर तसं—पांचवं पत्र.—अन् यांत माझा तरी काय दोष ? सध्यां माझी अशी स्थिती झाली आहे कीं मनांत जसं येईल तसं भरकटायचं. काय लिहिलं हें मी पुन्ह

एकदां वाचून पाहतें अन् त्यांत नुसते मनांत उठणारे तरंग—येणारे दुःखाचे कढ—हेच जर का असले तर मग मी आपल्या दुःखाचा लोंढा येईल त्याचा मार्ग खुला करून देतें—व तो ओसरे-पर्यंत स्वस्थ बसतें. तिकडनं सांगायचं कीं 'हा मोहपाश आवरून, आणि इकडे काय ज्या गोष्टी घडतील त्या लिहून धाड. जेव्हां त्या लिहिशील तेव्हां तूं आपलें स्वतःचें मतही पण लिहीत जा.' तिकडची आज्ञा. ती मला पाळलीच पाहिजे. मग त्याचा परिणाम कांहीं कां होईना.

पण हें पाहा, एखाद्या वेड्याच्या इस्पितळांत मात्र माझी रवा-नगी करायची नाहीं हो! काय सांगावं, नशीबांत काय काय लिहिलं आहे तें? तशी पाळी यायची नाहीं—अन् तीही इकडच्या कृपेनं—असं कशावरनं ह्मणायचं? ह्मटलं त्याचे उपकार एव्हांच मानूं का?

स्पष्टपणें सांगू? या इथल्या गोष्टी पाहून माझं स्वतःचंच डोकं फिरलं. अन् त्याच गोष्टी तिकडे लिहायच्या व डोकं पिकवायचं! स्वतःला तिकडे एवढीच कां कामं आहेत करायला? इतर मह-त्वाचीं कामं थोडीं का आहेत? यानं एवढंच व्हायचं कीं स्वतःच्या समोर एखाद्या गरीब माणसाचं काम चालू असलं तर त्या बिचा-ऱ्याचं मात्र विनाकारण नुकसान व्हायचं.

आज एवढंच पुरे! पण स्वतःवर बाजू आली बरं का! माझीं तीन पत्रं, तरी तिकडचं एकच! पण स्वारी मला गांठील अशी मुळींच उमेद नाहीं!

आपली,

कमला.

---



# पत्र ४ थें.



## डॉक्टरसाहेब.

**म**दनाणेश्वरा,—आपलं पत्र आलेलं पाहून मला भारी आनंद झाला. आतांपर्यंत जिवावर जें एक प्रकारचं दडपण होतं तें पत्र आल्यानं नाहींसं झालं. मुक्कामाला जाऊन पोहोंचल्यापासनं स्वारीचं पत्र कसं नाहीं याच बुचकळ्यांत मी होतें. अन् तशांत माझा शंकेखोर 'तर्कटी' (तिकडून नेहमीं ह्मणायचं तसं) स्वभाव असल्यानं अनेक शंकाकुशंकांनीं माझं मन अगदीं भंडावून सोडलं होतं.

तिकडची परत बदली, इतक्या लौकर होण्याचं लिहिलं त्यावर माझा काडीइतका दिखील भरंवसा नाहीं. बहुशा, पत्र पाठविण्यांत झालेल्या उशिराबद्दल माझी टकळी सुरू होईल ती कशी तरी टाळावी यासाठीं हें मधाचं बोट मला लावलं असावं !

तिकडनं मला एक वेळ कोर्टाच्या तत्त्वांसंबंधांत सांगायचं झालं, व त्या प्रसंगीं 'दहा गुन्हेगार सुटले तरी एक वेळ चालेल पण एका निरपराधी मनुष्याच्या केसाला धक्का न लागावा' असं न्यायाचें तत्व असल्याचं ह्मटलं. व त्याच वेळीं पुढं असंही सांगणं झालं कीं याच तत्वावर, आरोपीवर गुन्हा लागू न झाला तर त्याला 'संशयाचा फायदा' देत असतात. याची मला सहज-

गत्या आठवण झाली. तिकडनं जसं समोर चाललेल्या खटल्यांत वागायचं त्याचप्रमाणें मीही आज इकडे ‘ संशयाचा फायदा ’ देतें.

पहाटपासनं मला अगदीं गळल्यासारखं वाटतं आहे किंचित् अशक्तताही वाटूं लागली आहे. काल आंवशीं मला एकदम तापानं गाठलं. आणि बाबांनीं असो किंवा आईनं असो डाक्टरांना बोलवणं धाडलं. आणि ह्मणतात तसं मूर्ती दत्त—मीं आपल्याशींच इकडे विचार करीतच होतें. इकडे ठाऊकच आहे कीं मला एकंदर डाक्टरांचाच कंटाळा आहे. त्यांची ती खादाड नजर पाहून मला अगदीं कसंसंच होतं. आणि त्यांच्या त्या थर्मामेटर व स्टेथॉस्कोपची तर मला भीतीच वाटते. डा. बेअर्ड व पांच बहिणीची गोष्ट मला एकदा माझ्या मैत्रिणीन सांगितली होती ती ऐकून कोणालाही भीतीच बसायची. आपले डॉक्टर हे तसले तापदायक नाहींत हो ! निदान काल रात्रीं तरी त्यांचा कांहीं त्रास वाटला नाहीं खरा. रोग्यांचे उंबरठे झिजवून झिजवून ह्मणा किंवा दुसऱ्या कशामुळं ह्मणा पण जे आले ते त्यांनीं माझी एक वेळ नाडी पाहिली व लागलीच औषध लिहून दिलं. चार पुड्या तीन तीन तासांनीं घ्यावयाच्या व पहाटेस प्रकृतीचं मान त्यांना कळवायाचं. आज माझी प्रकृती चांगली आहे. चला. डॉक्टर साहेबांची फी पिकली, व त्यांच्या विषयीं बाबांच्या मनांत पूर्वीपेक्षां जास्त चांगला ग्रह झाला. बरं पण त्या औषधाच्या पुड्यांची वाट काय ! त्या–त्या–तर माझ्या मेजाच्या कप्प्यांत स्वस्थ घोरताहेत !

काय मौज पाहा ! जिथं थर्मामेटरनंही हात टेकायचे अशा विकृतीला ह्या लोकांनीं औषध देण्याचं धाडस करायचं ! या-

वरनं मला तरी यांच्याच प्रकृतीला विकृती झालीसं वाटूं लागलं आहे ! मी ह्मणतें, यांच्या शहाणपणाची व धाडसाची शर्थ झाली ! पण माझं—हें बायकांचं बडबडणं—कोण ऐकणार ?—त्याला काय किंमत ! खरंच, स्वारी गेल्यापासनं माझ्या प्रकृतीत थर्मामेटरच्या पाऱ्याप्रमाणं सारखा—दर अर्धाघटकेला—उतारचढ होतो आहे. असल्या या मानसिक व्याधीचं बरोबर निदान या बापड्यांना काय करतां येणार ? त्याला डाक्टर वेगळाच पाहिजे. त्याचे धन्वंतरी आपण-स्वत:खेरीज दुसरा कोणता डाक्टर या व्याधीची चिकित्सा करूं शकेल !

छे ! मी कीं नाहीं भारीच वहावलें. लेखणी भलतीकडेच वहावत चालली. तेव्हां आतां आटोपतं घेतलंलंच बरं !

आपली,

कमला.





# पत्र ५ वें.



## रंगुताईशीं झालेला संवाद.

## ' आलिया भोगासी असावें सादर.'

पण मी ह्मणतें ' भोग भोग ' तो कसला ? आणि त्याला सादर कसं व्हायचं ? मला तर आपलं याच्या उलट वाटतं. ज्याला सादर व्हायचं नसेल त्यानं त्या आलेल्या भोगाची कंबरच मोडायला हवी. काय, आपल्याला हें कोडं कां वाटतं ? तर मग सोडवायचं तें— सुटत असलं तर. पण मला इकडे इतकं सुचवावंसं वाटतं कीं त्याचा या आपल्या दीन दासीशीं कांहीं संबंध नाहीं हो !

काल तिसऱ्या प्रहरीं इथं मला रंगू भेटायला आली होती. असेल चांगली दोन एक तास इथें—किंवा थोडा अधिकच वेळ. आर्धी कांहीं वेळ वीणा वाजविण्यांत घालविला. अन् मग आमच्या इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू झाल्या. बोलतां बोलतां तिनं मला इकडच्या त्या " लटक्या ममतेवर " बराच वेळ व्याख्यान दिलन्. पण मधेंच मी तिला एक आडमुठयासारखा प्रश्न केला. त्यानं लागलीच विषय बदलला, अन् माझं कार्य झालं.

मी ह्मटलं ' गडे रंगू, मी बोलतें त्याचा तुला राग नको येऊं देऊंस हो. या संबंधांत मी तुला विचारीन विचारीन ह्मणून किती दिवसांपासनं तरी ह्मणतें आहें. पण बाई तुला विचारायला माझी

आपली जीभच अडखळते. इतक्या लहान वयांतच तूं सोवळं होण्याची ही अशी घाई कां केलीस हें मला कळेल कां ? मी तर असं ऐकतें कीं यांत तुझ्या त्या वृद्ध नेमनिष्ठ आईबापांचा आग्रह नसतांना! तूं आपण स्वतःच होऊन ह्याची घाई केलीस.'

हा जो दांडगेपणा मीं केला त्याचं मला वाईट वाटलं. कारण त्या माझ्या प्रश्न विचारण्यानं रंगूचे डोळे भरून आले, पण लागलीच आपलीं आसवं पुसून आपल्या नेहमींच्याच सरळ पद्धतीनं ती ह्मणाली "गडे कमले, मी कांहीं तुझ्यासारखी शिकली सवरलेली नाहीं. घरची गरिबी. त्यामुळें घरींच मास्तर ठेवून शिकवायचं माझ्या आईबापांना सामर्थ्य नव्हतं. बरं शाळेंत घालायचं तर तेंही घरच्या अडचणीमुळं जुळलं नाहीं. पण देवान जी कांहीं थोडी फार अक्कल मला दिली आहे तिच्या बळावर मी तुझ्या त्या बोलक्या-सुधारकांची खात्री करून देईन इतकी हिंमत बाळगतें. हें मी अभिमानानं ह्मणतें असं मात्र समजूं नको हो ! कांकीं यांत आपलें तें काय आहे ? बुद्धी देणं हें परमेश्वराचं कार्य आहे."

तिचा तो बोलण्याचा आवेश—स्वतःच्या मताविषयींचा अभिमान—हीं पाहून तर मला हंसूंच सुटलं. तें आवरतां आवरेना. शेवटीं मोठ्या कष्टानं तें दाबलं. मी कांहीं एक न बोलतां आश्चर्ययुक्त व सूचक अशा मुद्रेनें तिच्याकडे पाहिलं.

तिचा बोलण्याचा तडाका सुरूच होता. ती ह्मणाली—"पुरुष ते पुरुष, अन् बायका त्या बायका. व्यवहारांतली ही एवढी साधी गोष्ट देखील हीं शहाणीं ह्मणवणारीं माणसं विसरतात. पण त्यांनीं हवी तेवढी खटपट केली तरी त्यांना ह्यांत फेरबदल कां करतां

येणार आहे ! कांहीं गोष्टी पुरुषांनींच करायच्या—त्या बायकांना कांहीं साधायच्या नाहींत. व त्यांनीं त्या भानगडींत पडूंही नये अशाच असतील."

" ह्मणजे, ज्यांचे नवरे गेले त्यांनीं आपलं वय कितीही कमी असलं तरी पुन्हां लग्नाच्या भानगडींत पडूं नये, हेंच कीं नाहीं तुझं ह्मणणं ?"

" होय, तेंच माझं ह्मणणं. अन् हें पाहा—तुझी माझी गोष्ट हो—जे कोणी ह्याचे अभिमानी असतील—मग ते पुरुष असोत किंवा बायको असोत—मला कांहीं त्यांच्या विषयीं आदर वाटत नाहीं."

" रंगू, हें कोणत्या अपराधाबद्दल बाई ? दहा वर्षांच्या कोवळ्या मुलींनीं—त्याहूनही लहान लहान मुलींनीं—केवळ त्यांच्या डोक्यावर लग्नाच्या अक्षता पडल्या एवढ्या करितांच कां त्यांनीं सारा जन्म वैधव्यांत घालवायचा आणि कसं बसं आयुष्य ढकलायचं ? ज्याची तिची ओळख दिखील झाली नाहीं किंवा तिनं ज्याला पसंत केला नाहीं अशाच्या नांवावर ?—छे ! अशा या जगण्यांत तरी काय मौज ? त्यापेक्षां मरण आलेलं काय वाईट ?"

माझी मैत्रीण आवेशांत येऊन ह्मणाली " पसंतीचा नाहीं ह्मणजे ? मला वाटतं तुझी याच्याही पुढं मजल जाईल, अन् ह्मणशील कीं मोठाल्या घोडनवऱ्या वाढू द्याव्यात. त्यांनीं आपलं स्वयंवर मांडावं, अन् त्या आवडीनिवडीच्या पायीं—जिवाचे नसते विचके—विटंबना करून घ्यावी ! आणि तुझ्या मनांत—हें आंधळं गारूड—हें आंधळं प्रेम—याच्या बळावर हें जोडपं मोठं

सुखी निघेल, असं आहे तर ! बरं समजा कीं या आवडीनिवडींत जर का चुकी झाली तर मला वाटतं तूं त्यांना लग्नाची सोड-चिठ्ठीही द्यायला तयार होशील !"

यत्किंचित्‌ही विचार करण्याच्या भानगडींत न पडतां मी ह्मटलं "अर्थात् !"

"वा ! छान् ! ही साहेबी पद्धत चांगली उचललीस ! बरं त्यांच्यांतलीं तरी किती जोडपीं खरीं सुखी आहेत याची चौकशी केली आहे का कुणीं ? कमले, तूं नुसत्या त्या बाहेरच्या झकपकीवर नको जाऊंस. अग, 'जें जें चकाकतं तें सारंच सोनं नसतं,' समजलीस ? माझ्या तर असंही ऐकण्यांत आहे कीं, कांहीं कांहीं साहेबांना या आपल्या इकडच्याच चालीरीती पसंत आहेत. त्यांना आपल्या पद्धतीपासनं होणाऱ्या त्रासामुळं त्यांच्या तिकडल्या 'हक्काची' इकडच्या आमच्या 'कर्तव्याशीं' अदलाबदल करायला, मला वाटतं ते मोठ्या खुशीनें तयार होतील. पण साहेब ते साहेब—"

इतक्यांत आपल्या दिवाणखान्यांत, तो मेला धटिंगण—वकिली करायला लागल्यापासनं स्वर्ग दोन बोटं उरलेलं आहे तो इकडच्या परिचयाचा—न पुसतां न सवरतां, एकदम शिरला. त्यामुळं तिचं तें बोलणं तसंच तिथेंच थांबलं.मूर्ती पण मूर्ती ! डोळे मिचकावित मिचकावित, आपल्या त्या बारक्या मिशांना मधून मधून पीळ देत देत, स्वारी कायशी आपल्याशींच पुटपुटली. आम्हांला त्यांतलं एक अक्षरही कळलं नाहीं. मी आपलं तर्कानं म्हणतें कीं स्वारीच्या येण्याबद्दलची चौकशी करायसाठीं म्हणून ही मूर्ती

आली असावी. स्वारी कोणालाशी उद्देशून बोलत होती—मग त्याचं बोलणं त्या कडीपाटाशीं किंवा भिंतीशीं चाललं होतं हें नाहीं सांगतां येत. कारण त्यांच तें चोरट्या नजरेनं पाहणं चारी बाजूकडे पाळीपाळीनें चालल्याचें दिसत होतं. पुटपुटणं आटोपल्यावर स्वारी एखाद्या दगडाच्या निर्जीव पुतळ्याप्रमाणें कांहीं वेळ तटस्थ उभी राहिली. त्यांच्या त्या उभे राहण्याच्या ऐटीवरनं अन् त्या आविर्भावावरनं असं वाटलं कीं स्वारीला आपल्या रूपाचा भारी अभिमान असावा व तें आपलं रूप आह्मां दोघीजणींपुढं मिरविण्याची स्वारीला मोठी हौस असावी !

माझी तर बाई गाळणच उडाली. व मी आपली मान खालीं घातली. कां कीं असल्या या आचरट व उद्धट वागणुकीचा यापूर्वी मला कधींच अनुभव आलेला नव्हता. त्यामुळ मनाला कसंसंच वाटलं. पण रंगूच्या अंगीं मोठं अवधान ! अन् ती मोठी धीट. बायको मेल्यापासनं, गेल्या तीन चार महिन्यांत, तो सारखा तिच्या पिच्छाला लागला आहे ! यांत त्याचा हेतु शुद्ध असेल—निदान तो तसा असावा असं मी आपलं घेऊन चालतें.

रंगू मोठ्या धिटाईनं ह्मणाली, "कोण हवं तुह्माला ? इथें चाकरमाणसं नाहींत आपल्याला माहिती द्यायला ! अन् ती आह्मां बायकांकडनंही मिळण्यासारखी नाहीं."

यावर उत्तरादाखल त्याच्या तोंडावाटे एक शब्द निघाला तर शपथ; अगदीं निरुपाय होऊन खजील मुद्रेनं—कारण कांहीं माणसं इतकीं खंबीर असतात कीं त्यांना लाज ह्मणजे काय पदार्थ असतो याची ओळखच नसते. ते अपमाना-विपमानाची

मुळींच पर्वा करीत नाहींत—रावसाहेब पोकळडोक्यांची स्वारी एकदांची चालती झाली. पण जातां जातां पुन्हां एकदां त्यांनीं त्या आपल्या बारक्या मिशांना पीळ दिलाच. तेवढ्या त्या थोडक्या वेळांत, मला वाटतं, हा सह्राव्यांदा पीळ असेल त्यांच्या मिशीला !"

आपली उडालेली तिरपिट रंगूच्या लक्षांत येऊं नये ह्मणून मी ह्मटलं, " हा गृहस्थ अगदीं वेडावलेला दिसतो."

त्यावर माझ्या मैत्रीणीनं टोंचून ह्मटलं, "खरंच त्याला प्रेमाचं 'वेड' लागल्याचं दिसतं खरं. अन् हा त्याचा उद्योग मसणांत गोवऱ्या जाईपर्यंत सारखा असाच चालायचा. बिचारी बायको मेल्याला पुरे आठ दिवस देखील लोटले नसतील; तेव्हांपासनं—एकदम चार ठिकाणीं यांच्या लीलांना सुरुवात झालेली. काय असेल तें असो—दिवसेंदिवस यांचं वय वाढायच्या ऐवजीं कमी-कमीच होत जात आहे."

म्यां म्हटलं, " खरं कीं काय ? ही एक आज तूं मला नवी-नच बातमी दिलीस. आहे मोठ्या गमतीची. पण काय ग, रंगू ! आजपावेतों नाहीं माझ्या जवळ याविषयीं बोललीस तें ?—पण हें पाहा आतां बरीक त्यानं आपली पसंती कायम केलीसें दिसतें."

रंगू मध्येंच ह्मणाली, " हें पाहा गडे, देव त्याला सुखी ठेवो बापड्याला ! पण—त्याचं नांव सोडीनास."

" तो आपल्या प्रेमाच्या माणसावर पाळत ठेवील."

" अन् त्या प्रेमामुळें एखादवेळ स्वारीची गठडी वळायची वेळ यायची."

लोक त्याच्या पाजीपणाच्या कांहीं गोष्टी सांगत असतात. तशांतलाच एखादा मूर्खपणाचा प्रकार त्यानें केलान् तर तिनं सांगितलेला प्रकार घडणंही कांहीं मोठंसं अशक्य नाहीं.

आधींचा आमचा जो गमतीचा संवाद चाललेला होता त्याकडे पुन्हां वळून मीं ह्मटलें, "तर मग तुझ्या मतानं आपल्या लोकांना इकडचीच पद्धत सोयीची आहे. असंच कीं नाहीं ?"

रंगूनं उत्तर दिलंन्, "होय. पण मी असं मात्र ह्मणत नाहीं कीं आमची पद्धत अगदीं पूर्णत्वाला पोहोंचलेली आहे—अन् जगांत अशी कोणती गोष्ट आहे सांग बरं ! मनुष्याची कृति ही पूर्णत्वाला कधींच पोहोंचलेली नसायची. त्यांत दोष हे असायचेच. डोक्यांत कांहीं तरी कल्पना घेऊन उगाच जीवाचा संताप करून घ्यायचा—आटापिटा करायचा—याला वेडेपणा नाहीं तर आणखी काय ह्मणायचें ?"

मधेंच ती क्षणभर थांबली. तिच्या त्या भाषणाच्या माऱ्यापुढें माझी अगदीं गाळणच उडाली. तिचें तें बोलणें मला बऱ्याच अंशानं पटलं.

ती ह्मणाली, "धर्माच्या आणि नीतीच्या दृष्टीनें आमचीच पद्धति श्रेष्ठ आहे. कारण खरं ह्मटलं ह्मणजे ज्याच्यावर आपलं मन बसलं आहे त्याला वरण्यापेक्षां ज्याच्याशीं एकदां अक्षता पडल्या त्याच्यावर प्रेम करणं हें अधिक थोरपणाचं लक्षण आहे. आपल्या भावांची किंवा बहिणींचीच गोष्ट घेऊं. त्यांच्याविषयीं जी आपल्याला ममता वाटते ती कशी वाटते ? त्यांचा आपला असलेला संबंध व सहवास हाच नाहीं कां प्रेमाच्या मुळाशीं

असत ? नवऱ्याच्या बाबतींतही हीच गोष्ट कां लागू पडूं नये ? जन्म देण्याचा व संगोपनाचा भार जर आमच्या आईबापांवर असतो तर या लग्नासारख्या महत्वाच्या बाबतींतही जर आह्मी त्यांच्या मतानं चाललों तर त्यांत वावगं तें काय ? आणखी असं पाहा कमले, आपल्या लोकांत विवाह हा "धार्मिक संस्कार" मानला गेला असून तो तिकडल्या सारखा इकडे 'करार' ह्मणून मानीत नाहींत. या बंधनानं स्त्रीपुरुषांचा कायमचा एक-जीव केल्यासारखा होतो."

आश्चर्य वाटून मीं ह्मटलें, "कायमचं ह्मणजे नवरा मेल्यानंतर दिखील ? शिव ? शिव ? यापेक्षां मागें सती जायाची चाल होती ती काय वाईट ?"

रंगू—"छे ! छेः तशा करण्याला मी भेकडपणा ह्मणतें. नवऱ्याच्या बरोबर, देहाची मागें विटंबना होऊं नये ह्मणून, सहगमन करण्या-पेक्षां, त्याचे मागें राहून, त्यास मुक्ति मिळावी ह्मणून पुण्यकर्मे करीत आपलं आयुष्य घालविणं हें अधिक महत्त्वाचं. अशा प्रकारें आपल्या मनाला आवरून त्याच्याकरितां आपलं शरीर झिज-विणारी—व त्याची परलोकची गति सुद्धां पाहणारी—स्त्रीच खरी सह-धर्मचारिणी ह्मटली पाहिजे. हें होत नसलं तर पूर्वीची ती सती जाण्याचीच चाल चांगली होती. आतां सरकारनं हल्लीं कांहीं कार-णांमुळें ती चाल बंद पाडली ही गोष्ट वेगळी."

"अन् विधवांनीं लग्न करूं नये ह्मणून जें तुझं ह्मणणं पडतं तें एवढ्याकरतांच ?"

" त्यांना जर आमच्या धर्मांत राहायचं असेल, आणि जातीचा अभिमान असेल तर त्यांना असं वागयलाच हवं."

" गडे रंगू, अन् हा लाजिरवाणा व हृदयाला द्रव आणणारा प्रकार पाहून तुझ्या मनाला कांहींच वाटत नाहीं ?—दहा वर्षांहून कमी वयाच्या अशा २० लाख बालविधवा आपल्या या देशांत निघतील त्या साऱ्याजणींना आपलें हें राहिलेलें एवढें मोठें आयुष्य अगदीं शून्य वृत्तींतच घालवायला सांगणार तूं ?"

" यावर मी तुला असें विचारितें कीं, तिकडे दुसऱ्या सुधारलेल्या देशांत—जो देखावा दिसतो त्याहून का हा जास्त हृदयद्रावक ह्मणतेस तूं ?—तिकडे जास्ती नसल्या तरी तितक्याच द्वाड कुमारिका—अथवा स्त्रिया नवऱ्याच्या शोधांत असलेल्या सांपडतील. अग जिथें आवडीनिवडीचा प्रश्न आला तिथें मनाजोगता वर मिळेपर्यंत स्त्रीला वाट पाहिलीच पाहिजे. अन् शेवटीं मनासारखा जोडा न मिळाल्यानें कोणत्या तरी जरठाबरोबर आपला संसार थाटायचा, नाहींपेक्षां ह्मातारपणापर्यंत कौमार्यावस्थेंतच दिवस घालवून शेवटीं दुःखानें छाती फुटून मरायचें. याच्यापेक्षां आमच्याकडचा प्रकार जास्त लाजिरवाणा किंवा हृदयभेदक आहे असें मला वाटत नाहीं."

शिवाय दुसऱ्या एका गोष्टीकडे पाहिलें पाहिजे. अशा करण्यानं व्हायचें काय कीं समाजांत जी आज शांति व समाधान नांदत आहे त्या ऐवजीं लोकांत असंतुष्ट माणसांची संख्या वाढून हें एक नसतें अरिष्ट ओढवून आणल्यासारखं व्हायचं. हें पाहा कमले, साऱ्या गोष्टी आपण ज्या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहूं त्या दृष्टीवर

अवलंबून आहेत. मीं तुला पूर्वीच सांगितलें कीं जें जें चकाकतें तें सारें कांहीं सोनेंच नसतें."

माझ्या तोंडांतनं शब्दच फुटेनात. मी आपली तिचें बोलणें ऐकत स्वस्थ बसलें.

"आणि या आपल्या एवढ्या मोठ्या देशांत जिथें २० कोटी बायका आहेत त्यांत २० लाखांची ती कितीशी मातबरी ?"

तिचा तो बुद्धिवाद व कळकळीचें बोलणें ऐकून मी तर कुंठितच झालें. अन् नुसत्या शिकण्यानेंच सारा कार्यभाग होतो असें नाहीं ही गोष्ट माझ्या प्रत्ययाला आली. खरा शहाणपणा मिळवायला भाराभर पुस्तकांच्या वाचनापेक्षां अवलोकन आणि मनन यांचाच जास्त उपयोग होतो असें मला वाटलें. एका बाबतींत मात्र अद्याप माझ्या डोक्यांत विचार घोळत होते. त्यांचा मला उलगडा न झाल्यामुळें मी रंगूला फिरून ह्मटलें.

"पण गडे रंगू, तूं ह्मणतेस तें सारं जरी एक वेळ कबूल केलं तरी या तरुण विधवांना सोंवळं करण्याची जी घाई केली जाते तिचं मर्म नाहीं मला कळलं. त्यांच्या रूपाचं विद्रूप करायचा हा खटाटोप कशासाठीं अन् उपासतापास करून जिवाला जाळायचं तरी कशासाठीं ? या तिच्या देहदंडापासून नवऱ्याच्या आत्म्याला काय लाभ व्हायचा ? किंवा जगांत जे नाना प्रकारचे मोह असतात, त्यांच्यापासनं दूर राहण्यासाठीं ही पूर्वीच्या ऋषींनीं युक्ती तर योजली नसेल ? तुझंच पाहाना—पूर्वीं तूं कशी एखाद्या देवतेसारखी दिसत होतीस—पण तूंच आपल्या रूपाचं विद्रूप करून घेतलंस !"

रंगू रागवून म्हणते "जळलं मेलं तें रूप ! हें सारं तर्कट त्या नव्या बोलघेवड्या पंडितांचं असेल. त्या केसांचा अन् त्या रूपाचा स्त्रीच्या अंतःकरणशुद्धतेशीं काय संबंध ? ज्याच्या सुखासाठीं म्हणून हे केस दिले होते तो स्वतःच जर अस्तित्वांत नाहीं आणि त्याच्याच नांवावर व त्याच्याकरितां म्हणून जर तिला आपला काळ घालवायचा आहे तर मग ह्या केसांची तरी तिनं इतकी काळजी काय ह्मणून करायची ? "

हें ह्मणत असतांना तिचे डोळे पाण्यानें भरून आले. ती सद्गदित स्वरानें कापऱ्या आवाजानें ह्मणाली, " नवऱ्याच्या मागनं मग दागिन्यांची न् त्या रूपाची तरी एवढी काळजी कशाला ? जशी मी माझ्या केसांना व दागिन्यांना रजा दिली, तसंच, माझ्या हातीं असतें तर, मीं हें आपलं रूपही झुगारून दिलें असतं. परंतु करायचं काय ? देवानं हा देह माझ्या मागं लावून दिलेला आहे, तेव्हां शेवटपर्यंत तो कसा तरी धारण केला पाहिजे. माझी धर्मावर पूर्ण श्रद्धा असून माझ्या पतीची माझी स्वर्गीं गांठ पडेल असा माझा पूर्ण भरंवसा आहे."

हे शेवटचे शब्द उच्चारतांना तिचा गळा दाटून आला. तें पाहून माझीही पण तशीच स्थिति झाली. पतीविषयीं प्रेम व भक्ति, कर्तव्याविषयींचे विचार जे रंगूच्या बोलण्यांत आले ते–रंगूचें हें ध्येय खरोखरच अत्यंत उदात्त आहे. ' आपल्या नवऱ्याच्या मागें बायकोनें रूपाची किंवा दागिन्यांची कशासाठीं चिंता वहावी ?'–यांच्या पलीकडे, ' प्रेम व भक्ति' यांची मजल ती कोठवर जायची ?

थोडा वेळ आणखी थांबून व पुन्हां लौकरच भेटण्याचें कबूल करून ती गेलीच. तिनं पाठ वळाविली असेल नसेल तोंच—आपल्या शेजारीं कांहीं गडबड चालली असल्याचें कानीं आलं. आवाज ओळखीचाच. दोघं माणसं जोरानं ओरडताहेत, शिव्या गाळी करताहेत, मधून मधून मारण्याचाही प्रकार चालल्याचं ऐकूं येत होतं. ह्या लांबलचक पत्राच्या आरंभीं मीं जें कोडं घातलं आहे तेंच कोडं हें. सोडवायचं तें येत्या पत्रांत. अन् त्याच्या मोबदल्यांत आपल्या आवडीच्या माणसाकडून हवं तें बक्षिस मागून घ्यायचं.

आपली,

कमला.





# पत्र ६ वें.



## कोठें तरी व कांहीं तरी चुकतें खरें !

जिवलगा, आज एक चांगली आनंदाची बातमी कळवायची आहे. ती बातमी म्हणजे आपल्या गोदूच्या लग्नाचं ठरलं, ही. मुलगा मोठ्या घराण्यांतला असून हुंडा तीन हजार रुपये द्यायचा ठरला. याशिवाय करणी बिरणी निराळीच ! ठीकच आहे ! त्यांनीं आपल्या मुलाचं लग्न करायचं म्हणजे मुलीच्या बापावर त्यांचा हा उपकारच नाहीं का होणार ? खरं म्हटलं तर हें हुंड्याचं एवढ्यावरच तुटलं हेंच नवल म्हणायचं ! कारण मुलीच्या बापाला भिकेला लावलं नाहीं तर मग त्यांत आमचा मोठेपणा तो काय राहिला ? तरी बरं कीं मुलगे किंवा मुलीच होणं हें कोणाच्या हातचं नाहीं. प्रत्येकाला मुली होण्याचा संभव असतो. मुलीच्या आंगावर दागिनेही चांगले गोठ तोडे–बिंदी बिजवऱ्यापर्यंत–दहा हजारांपर्यंत घालायचं ठरलं आहे. मग आतां एवढा हुंडा जो घेतला त्याला काय हरकत ! पत्रिकाही जुळलीच–छत्तीस गुण मिळाले. अन् बाकीचं सारं जुळलं कीं पत्रिका या जुळायच्याच ! आपल्या डोळ्यासमोर नातीचं लग्न जुळल्याचं पाहून म्हाताऱ्याला मोठं समाधान वाटलं. आतां वाटेल तेव्हां मरण आलं तरी त्याला म्हाताऱ्याची तयारी. त्याला सुखानं मरण येईल. लग्न याच पंधरवड्यांत व्हायचं ठरलं आहे.

रंगूताईचं त्या दिवशीचं मुद्देसूद बोलणं अजून माझ्या कानांत गुणगुणतं आहे. तिच्या ह्मणण्यांत बरंच तथ्य आहे; पण वयांत येण्यापूर्वीं घडून येणारीं जबरीचीं लग्नं—( निदान आपल्या ब्राह्मणांतलीं तरी ) पाहून माझं तर मन अगदीं गोंधळून जातं. लग्न ह्मणजे नुसता सट्टा झालेला आहे. बाजारचा सौदा करायचा, तशींच पोरींचीं लग्नं. कुशीच्या ( पोरगी मोठी गोड आहे बरं ) स्थळाचं अद्याप जुळलं नाहीं. बाप स्थळ पाहून पाहून अगदीं मेटाकुटीस आला आहे. कोठं गणगोत जमलं तर एक नाड येते, तर कुठं मंगळाचीच आड; कुठं हुंडाच भारी मागतात, कुठें मुलगा शिकला सवरलेला पण अगदींच अशक्त, अशा कांहीं ना कांहीं नडी निघतात. इकडे शेजारीं पाजारीं घरोघर तिच्या लग्नाचीच चर्चा चाललेली. ह्मणजे बापापेक्षां देखील तिऱ्हाइतांना मुलीच्या कल्याणाची काळजी जास्त ! तरी लोक कसे आहेत पाहा ! ! बापानं अजून लगीन केलं नाहीं ह्मणून त्याला नांवं ठेवायला एका पायावर तयार ! बिचाऱ्याची कोण फजीती ! त्यांचा सुधारणेकडे ओढा असल्याचं तिकडे ठाऊकच आहे. अन् तशांत एकुलती एक मुलगी असल्यानं ती त्यास जीव कीं प्राण ! अशा मुलीला—नुसत्या पुढच्या आशेवर वाटेल त्या घरीं त्यानं लोटायची का ? गेल्या शुक्रवारचीच गोष्ट; एका दीड शहाण्यानं एक स्थळ दाखविलं—थट्टेनं नव्हे हो—मोठ्या गंभीरपणानं “ अगदीं सुंदर ” असं स्थळ—वराचं वय अवघं ५० वर्षांचं—झालं, पहिल्या बायकोचीं पांच पोरं आहेत—असें सुरेख स्थळ हातचं घालविलन् म्हणून तो रागानं अगदीं लाल झाला. लोकांनीं तर अर्थातच त्याला वेड्यांत काढलं हें सांगायला नकोच !

खरंच, मुलीचं सोळावं वरीस संपण्याच्या आधीं तिचा वाङ्निश्चय किंवा लग्न करायचं नाहीं व पन्नास वर्षांहून अधिक वयाच्या वरास कोणी मुलगी द्यायची नाहीं अशा सारखा एखादा कायदाच कां नाहीं करून टाकीत ! एकदां सांगायचं झालं होतं कीं आपल्या राज्यकर्त्यांचं धोरण असं आहे कीं लोकांच्या धार्मिक व सामाजिक बाबतींत हात घालयचा नाहीं. असं सांगितल्याचं मला आठवतं खरं. पण हा नियम नेहमीं कांहीं पाळला जात नाहीं. कारण मनांत आलं तेव्हां हा नियम कांहीं आड आलेला नाहीं. असले कायदे लोकांना टाळतां येतात म्हणून म्हटलं होतं. कांहीं शहाण्या शहाण्या माणसांनीं असे कांहीं कायदे करण्याचा प्रयत्न करून पाहिला होता—त्यानं इथून तिथवर घोटाळा मात्र माजला. आम्हां बायकांना या कायद्यांतल्या तत्वाचं काय कळायचंय म्हणा. पण एवढं बरीक खरं कीं कुठें तरी अन् कांहीं तरी चुकत आहे खास ! या बाबतींत लोकांस ताळ्यावर आणायचं असलं तर उपाय सक्तीचेच योजायला हवेत.

आतां मी आटोपतेंच. यापुढें जर लिहायला लागलं तर नेहमीं सारखी वेडाची लहर येण्याचा संभव आहे. उद्यां कांहीं लिहायचा विचार नाहीं. स्वारीशिवाय एकएक दिवस कसा कष्टांत जात आहे.

आपली,

कमला.





# पत्र ७ वें.



## जन्मगांठीच्या दिवशींचा थाट !

**प्रा**णेश्वरा, किती तरी मायाळू स्वभाव हा ! कीं हिरेनामी बांगड्या, मोठ्या प्रेमानं—अन् मला नेमक्या त्याच दिवशीं पोंहोचाव्यात या बेतानें पाठवायच्या ! कामाच्या एवढ्या गर्दींत माझ्या विषयीं इतकी काळजी बाळगायची—माझ्या वाढदिवसाची आठवण ठेवायची, आणि मला देखील कळूं न देतां त्या खरेदी करून स्वतः बरोबर न्यायच्या !—यावरनं तिकडे—मनांत थोडं फार प्रेम वसतं आहे हें तर दिसतंच.—निदान मी तरी त्यावरनं आपलं असंच अनुमान काढतें. खरंच गडे, इथं जर असायचं झालं असतं तर मी स्वतःला आपलं अंतःकरण उघड करून दाखविलं असतं अन् मग कळलं असतं. या आपल्या प्रेमाबद्दल ही आपली दासी आपली किती ऋणी आहे तें. प्रियकरा, तिकडच्या वियोगानं माझं अंतःकरण कसं पोखरून निघालं आहे. मला " शंकेखोर तर्कटी" ह्मणून ह्मणायचं—हा आळ सोसायचा ह्मणजे मोठं कठीण. माझ्या अंतःकरणांत जें विचारांचं काहूर माजलं आहे त्यांच जर या कागदावर मला चित्र मांडतां आलं असतें तर त्याच्या योगानं मनावरचं ओझं किती तरी हलकं झालं असतं. पण मन आवरून धरण्या विषयींची तिकडची आज्ञा मला अक्षरशः पाळली पाहिजे; नाहीं तर हें मन मोकळं सुटायचं अन् तसं झालं ह्मणजे—न जाणो—मी आपल्याला कायमची अंतरायची !

कालची मेजवानी थाटांत पार पडली. बोलावणं केलेल्या साऱ्या बायका आल्या होत्या. नाहीं आली काय ती भारती. पण तिच्या नवऱ्यानें दुसरं लग्न लावल्यापासनं ती मुळीं बाहेर कुठेंच जेवायला जात नाहीं. काल कांहीं छान छान गाणीं ऐकायला सांपडली. त्यांत त्या आपल्या रजिष्ट्रारांच्या घरच्या मुली—त्या तिकडे ठाऊकच आहेत—त्यांच्या गाण्यांनीं तर मनाला चटकाच लावून सोडला. त्यांचा तो कोकिळेसारखा गोड आवाज—त्यांचे ते कोमल व पोरवयाला साजेशे हातवारे पाहून बायका अगदीं मोहून गेल्या. ( मला आतां त्यांचं नांव आठवत नाहीं )—पण ते चिरुटभक्त तिकडचे स्नेही इथं काल असायला हवे होते—मला त्यांची भारी आठवण झाली. कारण एवढंच कीं त्यांना आपल्या मुलींना लिहिणें वाचणें किंवा गायन वगैरे शिकवायची भारी चीड आहे—कालच्या त्या दोघां मुलींचीं—बहीणींचीं—गाणीं जर त्यांनीं ऐकलीं असती तर त्यांनीं अगदीं खास तारीफ केली असती व त्यांच्या विचारांतही थोडासा फरक झाला असता.

पुरुषांपावेतों—त्यांच्या कानीं जाईपर्यंत—मोठ्यानें गाणीं होऊं नयेत ह्मणून आह्मीं एक युक्ती योजून ठेवली होती. मोलकरणीला अगदीं बाहेरच्या फाटकाशींच पहारा करायला बसवून ठेवलं होतं. ही अशी सावधगिरी ठेवण्याचं कारण तो पोकळडोक्यांनीं केलेला आचरटपणाचा प्रकार आमच्या आठवणींतनं अद्याप बुजला नव्हता.

खरंच, आपलं सहज विचारतें. आपल्या त्या पोकळडोक्यांची बहीण विधवाश्रमांत पुन्हां लग्न लावायासाठीं ह्मणून गेल्याची लोकांत दाट वदंता आहे—याची आहे कां तिकडे कांहीं बातमी ?

मला तर ही गोष्ट अगदीं खोटी वाटते. काल्च ती अन् तिची आई इथं होत्या. पोर मोठ्या खडतर नशीबाची खरी ! अजून तिच्या ओठावरचा जार देखील वाळला नसेल तोंच तिला वैध-व्याची दीक्षा ! या पुढं सारा जन्म कपाळाला हात लावून कंठा-यचा ! हें पाहून कीं नई काळीज तिळतिळ तुटतं ! कुटाळ मंडळींनीं तिच्या नांवाचा गांवभर बोभाटा करून सोडला आहे. याला कारण कोणतं ह्मणून विचारलं तर एवढंच कीं, ती लग्ना-कार्यांस जाते न् अजून ती सोंवळी झाली नाहीं. हें तिचं करणं जुन्या मंडळीला कुठलं खपायला ?

आहे कां ध्यानांत ?—त्या मालचाल्यांची बायको—पिंपळाच्या पाराला प्रदक्षिणा घालीत आणि नवस करीत होती ती ? त्याचं स्वारीला भारी हंसूं यायचं. त्या वेळीं लोकांच्या 'खुळचट धर्म-भोळेपणाबद्दल' कायसासा टोमणा द्यायचा झाला होता ! मग आतां याचा उलगडा कसा करायचा ? कारण ती बाळंतपणा-करितां, आपल्या बहिणीकडे आलेली असून तिचे दिवस अगदीं भरत आलेले दिसतात.

अजून मला थकल्याथकल्यासारखं अन् जीव गळाल्यासारखं वाटतं आहे. काल रात्रीं किती वेळ तरी विचार करीत बसलें होतें त्याचा हा सारा परिणाम !—बरं डोळा लागल्यावर तरी काय? एकसारखीं स्वप्नामागून स्वप्नं पडत होतीं. किती तरी मजेदार तीं स्वप्नं अन् त्या वेळचे ते गोड गोड देखावे ! पण शेवटीं काय—निराशा !

आपली,

**कमला.**



# पत्र ८ वें.



## ग्रहण व प्रेम.

**आ**ज सकाळला समुद्रावर किती तरी मौजेचा देखावा आह्मांला पाहायला सांपडला ! खग्रास ग्रहण असल्यानें सूर्यबिंब अगदींच सौम्य आणि निस्तेज दिसत होतं. भर दुपारला चांदण्या रात्रीचं रूप दिसूं लागलं. एकंदर देखावा मोठा गंभीर व भयप्रद असाच दिसत होता. अगदीं नास्तिक माणसांच्या मनांत दिखील आश्चर्य व आदर उत्पन्न झाल्याखेरीज राहिला नाहीं.

आपल्याला जुनी कथा माहीतच आहे. ब्रह्मदेवानें सूर्याला व चंद्राला त्यांच्या हातानें कांहीं पाप घडलं ह्मणून शाप दिलान् कीं तुमच्या या अपराधाबद्दल तुह्मांला प्रतिवर्षी साप गिळतील. आणि तेंच हें आपलं चंद्राचं अन् सूर्याचं ग्रहण.त्या जुन्या कथेचा असा संबंध लावीत असतात. छायेवर बसविलेलं रूपक ह्मणजेच हे साप. पण यावर माझी एक आपली तिसरीच–निराळीच कल्पना धांवते. मला आपली एकाएकींच सुचली ती.

सांगूं का माझी कल्पना ? पण मला बाई मोठी भीति वाटते, कीं ती ऐकून तिकडे हंसूं येईल आणि माझ्यावर ‘ तर्कटी’पणाचा असलेला शिक्का पक्का होईल ! पण मी सांगतेंच. मला तर आपलं असं वाटतं कीं प्रेमाच्या योगानं माणसाच्या अंगीं जी मृदुता येते, व त्याच्यांत जें सात्विकतेचें वारं खेळूं लागतं त्यावर हें–सापाचं

काय किंवा छायेचं काय—रूपक बसविलेलं दिसतं. परस्परांतील प्रेमामुळं स्त्री आणि पुरुष हे एकमेकांना गिळतात. नाहीं तर काय ? तिकडनं मला त्या साहेब लोकांत चंद्राला स्त्रियांचं रूप असल्याचं सांगितलं होतं. तें जर खरं मानलं तर अन् त्याच्या शीतलपणाकडे व सुंदरपणाकडे पाह्यलं ह्मणजे हें बायकांचंच रूप मला जास्त पटतं. दिनराज सूर्य आणि त्याची राणी ( चंद्र ), यांनीं, या सटीसहामाशीं पडणाऱ्या गांठीमुळें अत्यंत उत्सुकतेच्या भरांत एकमेकांस कवटाळलं नसेल कशावरून ?

त्या वेळीं मला सहजच ' इकडली ' आठवण झाली. कोणतीही भव्य अन् शोभिवंत अशी गोष्ट दृष्टीस पडली कीं मला आपली इकडील आठवण व्हायचीच ! माझ्या मनांत असं यायला लागलं कीं ज्यांनीं आपलं आयुष्य लूट व जाळपोळ करण्यांत घालविलं, ज्यांना मनुष्याचा प्राण घेणं हें ढेंकूण चिरडण्याइतकंच महत्त्वाचं वाटत होतं अशा क्रूर, जुलमी, मी मी ह्मणणाऱ्या सत्ताधीशांच्या हृदयाचं पाणी स्त्रियांनीं आपल्या निरतिशय प्रेमानं कसं केलं आहे ? स्त्रीच्या रोमारोमांत प्रेम ओथंबलेलं असतं; त्यांच्या अंतःकरणांत प्रेमाशिवाय इतर कांहीं सांपडणार नाहीं; तिच्या त्या जीवंत आणि अत्यंत निर्मळ अशा प्रेमप्रवाहांत पुरुष बुडून जातो; त्याच्या अंगीं दिसून येणारी कठोरता नाहींशी होऊन तो अतिमृदु बनतो, आणि त्यांतून बाहेर पडल्यावर त्याच्या आंगावर एक प्रकारची तेजाची दिव्य छटा झळकूं लागते व ती वाढतां वाढतां त्याला शेवटीं अत्यंत श्रेष्ठ व उन्नत अशा स्वरूपाला नेऊन पोंहोचविते.

आज पहांटेस माझं अंतःकरण इतकं खिन्न होतं कीं, मी आपल्या ठिकाणीं, बाहेर पडायचं नाहीं, घरींच रहायचं, असा निश्चय केला होता. अन् एक सबंद भिंगचेंभिंग फोडून त्याच्या एका तुकड्यावर काजळ पाडलं होतं. त्यांतनं घरच्या घरींच बसल्या बसल्या ग्रहण पहायचं मीं ठरविलं. पण इकडे आईचा व बाबांचा आग्रह पडला कीं गाडींत बसून समुद्रावर जायचं ह्मणून. असं करण्यांत त्यांचा हेतू हा कीं त्यापासूनं माझ्या मनाला किंचित् हुशारी येईल. भोळीं बिचारीं ! या फेरफटक्यानं फार तर उल्हसित वृत्तीच्या आच्छादनाखालीं आंतल्या आंत भाजणारी परंतु अस्फुट अशी खिन्नता मात्र जास्त वाढेल हें त्यांच्या लक्षांत आलं नाहीं. मला या गोष्टीचं मात्र राहून राहून नवल वाटतं कीं हीं तरुण असतांना यांना स्वतःला कधीं अशा अडचणी पडल्याच नसतील काय ? यांचा आयुष्याचा ओघ अगदीं संथ-पणें, इकडे तिकडे न वळतां अखंड वाहात गेला काय ?

गर्दीतनं गाडी नेण्याची सोयच नव्हती. त्यामुळें बऱ्याच अंत-रावर तिला सोडून आह्मी पायींपायींच, समुद्रकिनाऱ्यापर्यंत, चालत गेलों. त्या वेळचा तो देखावा अत्यंत चित्ताकर्षक असा होता. समुद्राच्या लाटा किनाऱ्यावर येऊन मोठ्या जोरानं आदळत. त्या वेळचा त्यांचा तो आवेश पाहून कोणाला वाटेल कीं, या पर्वाच्या निमित्तानं स्नानासाठीं मोठी छाती करून आंत उतर-लेल्या किंवा उतरूं पाहणाऱ्या स्त्रीपुरुषांना वाहून न्यायचं असा त्यांनीं मनाशीं निश्चयच केलेला असावा !

उत्तरेकडच्या या एका टोंकापासून तों थेट दक्षिणच्या दुसऱ्या टोंकापर्यंत एक मैलभर प्रदेश सारखा माणसांनीं गजबजलेला

होता. पण तिथें जमलेल्या माणसांची एकंदर संख्या किती भरेल, व त्यांत स्नानासाठीं आलेले किती व निव्वळ मौज पाहायसाठीं ह्मणून किती, हें कसं सांगतां येईल ? दूर एका टोंकाला एक फोटो काढणारा, घोड्यावर कॅमेरा बसवून कशाचासा फोटो घेण्याची खटपट करतो आहे असं दिसत होतं. मधून मधून एका लांबच लांब अशा बांबूच्या टोंकाला बरींचशीं खेळणीं अडकविलेलीं दिसत. पण माणसांच्या त्या भयंकर गर्दीत ते खेळ नेणाऱ्या माणसांचे चेहेरे मात्र दिसत नव्हते. भिकारी तर पावलोपावलीं दिसत. त्यांत कांहीं बसलेले, कांहीं फिरतांना, थोडेसे गातांना—तर १०।२० शंख फुंकतांना दिसत. अशी एकंदर मोठी मौज दिसत होती. पश्चिमेकडच्या बाजूकडे पाहिलं तेव्हां थोड्या अंतरावर दोन साहेब घोड्यावर बसून जात असलेले दिसले. त्यांनीं आपले घोडे शेजारीं शेजारीं दुडक्या चालीनें पण हळुहळू चालविले होते. ते मध्येंच थांबत थांबत—वळणें घेत घेत, व गप्पा मारीत चालले होते. त्यांपैकीं एक मडम असल्याचं माझ्या चटकन् लक्षांत आलं. आणि तिला त्या आनंदाच्या शिखरावर बसलेली पाहून तिच्या त्या सौख्यमय स्थितीशीं मी माझ्या दुःखमय स्थितीची तुलना करूं लागलें. त्या वेळीं मनांत ज्या दुःखाच्या उकळ्या फुटल्या व जें भयंकर विचारांचं काहूर माजलं त्यानं शेवटीं माझं देहभान नाहींसं झालं. पण इकडचे ते वकीलशिरोमणि माझ्या मदतीला ह्मणून धांवून आले अशा रीतीनं त्यांचं अचानक दर्शन झाल्या कारणानं वाटलेलं आश्चर्य आणि तसेच ते एकदम अदृश्य झाल्यामुळं आंतल्याआंत येणारं हंसूं—यांमध्यें बाकीच्या साऱ्या वृत्ति विरून गेल्या. आनच्या पासून

पन्नास पावलांवर पोकळडोके येत असतांना मीं पाहिले. आणि बरोबर त्यांच्या जोडीला, ते जगन्मित्र—दुसऱ्याच्या जीवावर उड्या मारणारे—मुसळे—हे होते. पण त्यांची मला ओळख पटण्याच्या पूर्वींच बाबांच्याकडे पोकळडोक्यांची ओझरती नजर गेली, अन् काय चमत्कार सांगावा !—बाबा नजरेस पडतांच स्वारीनं लागलाच तिथनं पळ काढला. अन् काय ? त्यांचे ते दीड शहाणे स्नेही आपल्या मित्राचा पदर घट्ट धरून त्यांना सारखे मागं ओढीत होते. पण पोकळडोक्यांनीं तिकडे मुळींच लक्ष्य न देतां आपली वाट चालायचाच क्रम सुरू ठेवला होता. भराभर पावलें टाकीत टाकीत एका क्षणांत स्वारी दिसेनाशी झाली.

एवढ्या त्या गर्दींत—माणसांची जिथें खिचडी झालेली होती अशा त्या दाटींत—हे एकचसे काय पण असे शेंकडों—हजारों पोकळडोके नसतील कशावरून ? कदाचित् या आमच्या पोकळडोक्यांची त्या साऱ्यांवर ताणही असूं शकेल !

एक मनोवृत्ति मावळून तिच्या जागीं दुसरीचा उदय किती झपाट्यानें होतो, याचा विलक्षण अनुभव मला आज सकाळला आला. पोकळडोक्यांच्या जाण्याचा तो गमतीचा प्रकार घडून आल्यानंतर मीं आपली नजर समुद्राकडे वळविली, तोंच एक अत्यंत मनोरम पण खेदजनक असा देखावा माझ्या दृष्टीस पडला. एक सुमारें सोळा वर्षांची देवतामूर्ती परत फिरणाऱ्या लाटांतून बाहेर पडत आहे—तिचा तो कोमल हात साठी उलटलेल्या एका वृद्ध कपीच्या—जख्ख म्हाताऱ्याच्या—हातांत आहे. तिची स्थिति या वेळीं मला एखाद्या बंदिवानासारखी दिसत होती. ह्या जोड-

त्याच्या झालेल्या लग्नाची बातमी जर का मला आधीं लागली नसती तर त्या थेरड्याला मी ह्या मुलीचे 'आजोबाच' म्हटलं असतं. पण त्या जरठाच्या अफाट संपत्तीला मागं कोणी तरी मालक हवा ना? तो व्हावा एवढ्या साठीं त्यानं हा खटाटोप केला होता!!

त्या परम सुकुमार व रमणीय मूर्तीला पाहून–तिची ती त्या वेळची भयानं व्याकूळ झालेली मुद्रा, आंगांत भीतीनं भरलेलं कांपरं, कपाळावर आलेले ते अस्ताव्यस्त झालेले पण त्यामुळेंच शोभा येणारे केस, तें मोतिया रंगाचं मलमलीचं तलम पोताचं पण भिजून किंचित् जड झालेलं पातळ व तें अंगाला घट्ट चिकटून बसल्या कारणानं सुंदर दिसणारी तिची ती आंग-लट, अशा त्या मूर्तीला पाहून मला ही कोणी जलदेवताच समुद्राच्या पृष्ठभागावर अवतीर्ण झाल्याचा भास झाला. व क्षणभरच बायकांचा जन्म आल्याबद्दल मला वाईट वाटलं. लागलींच माझं मन दुःखानं कळवळलं. असं तीव्र दुःख यापूर्वी मला कधींच झालं नव्हतं. त्या दुःखाच्या भरांत मला एकाएकीं आठवण होऊन त्या आवेशांतच माझ्या तोंडातून "रंगे, रंगे, कुठं तूं आहेस?" अशा प्रकारचे उद्गार बाहेर पडले.

प्रियकरा, मीं आपलं खरं खरं तें सगळं समोर सांगून टाकलं. आपल्यापासून मी काय चोरून ठेवणार? साऱ्या जन्मांत माझ्या हातून हें एक जें पाप घडलं त्याची मला क्षमा नाहीं कां व्हायची? कोणीं माझ्यासमोर जगांतली सारी संपत्ति आणून ओतली ह्मणून तेवढ्याला भुलून माझ्या असलेल्या स्थितीचा पालट करण्याची

इच्छा मला कधीं तरी होईल काय? छे ! कधींच नाहीं.कारण ज्या ठिकाणीं स्वारीच्या अगदीं खालोखाल माझें प्रेम अशा या मूर्तीच्या पायांना मी अंतरलें असतें.

या माझ्या पातकाबद्दल तिकडनं मला कोणतं प्रायश्चित्त दिलं जायचं ? सकाळीं मी समुद्रावर गेलं होतं तेव्हां एका पायावर उभे राहून तपश्चर्या करणारे तपस्वी पाहिले. त्यांच्यासारखंच उभं राहून आपल्या त्या मधुर नामाचा मी एक लाख जप करूं काय? तसं असलं तर तें मी अगदीं मनापासून करायला तयार आहे.आपलं नांव ह्मणजे सर्वांत प्रिय अशा पूर्णावतार देवाचं–कृष्ण–हें आहे. अहाहा ! किती तरी मधुर नांव हें ! ! हे प्रभो ! हे स्वामिन् ! पुनः आपलें दर्शन कधीं घडेल ?

आपली,

**कमला.**





# पत्र ९ वें.

भाऊसाहेब व माईसाहेब.

प्रियकरा, आपलं बुधवारचं पत्र आत्तांच माझ्या हातीं पडलं. कोडयाचं उत्तर, आपलं चुकलं. आतां बक्षिस बिक्षिस विसरायचं. रंगूचा व तिच्या पाठीस लागलेल्या त्या कोडग्या निर्लज्ज माणसाचा या कोडयाशीं मुळींच संबंध नाहीं.

आतां गोष्ट अगदीं शिळी झाली. तेव्हां बारक्या सारक्या गोष्टी सांगून उगाच कंटाळा आणायचा हें कांहीं माझ्या मनाला रुचत नाहीं. ही भांडाभांडी—आपल्या जवळच ते भाऊसाहेब दुराके रहायला आले आहेत ना, त्यांच्या इथली होती. चहा केला होता तो कांहीं भाऊसाहेबांच्या पसंतीस आला नाहीं म्हणे. गेलीन् काय स्वारीची तब्यत ! गृहस्थानें तावातावांत आजपासनं चहाच घ्यायचा नाहीं—जो घेईल तो गाढवाचा लेक......वगैरे वगैरे निवडक पुष्पं वहात वहात तो न पिण्याची शपथ घेतलीन्. शेवटीं राग अगदीं अनावर होऊन त्या भरांत ऊन ऊन चहाचा पेला आपल्या बायकोच्या आंगावर उडवून दिलान्. बायकोही तितकीच खंबीर ! आपला झालेला हा असा अपमान तिला कुठला सहन व्हायला ? तिनंही तें भांडं तसंच परत भिरकावून दिलन्—कुत्र्यासारखं वसकन् आंगावर येण्याबद्दल चांगलीच पूजा केली. मग काय विचारतां, पतिराजांचं पित्त साहजिकच भडकलं आणि

लाथा व बुक्यांचा मारा सारखा सुरू झाला. माईसाहेब—भाऊसाहेबांचं कुटुंब यांची तब्यत किती नाजुक आहे हें इकडे ठाऊकच आहे. त्यांनीं मोठ्यानं एक किंकाळी फोडली व त्या लागलीच बेशुद्ध पडल्या.

हा प्रकार घडल्यापासून आसपास, शेजारीं पाजारीं मोठी खळबळ उडालेली आहे. नवरा नी बायको या दोघांच्याही वतीनं बोलणारीं माणसं कांहीं कमी नाहींत. वडीलधाऱ्या—ह्याताऱ्या कोताऱ्या माणसांना यांत त्या पोरीचाच अपराध दिसला. या त्यांच्या दिसण्याला कांहीं आधार आहे असें मुळींच नाहीं. त्यांचं ह्मणणं असं पडलं कीं, "माणसाच्या मागं नाना तऱ्हेच्या भानगडी लागलेल्या असतात. त्यांत थकून भागून माणूस घरीं आलं ह्मणजे, त्याला त्या कंटाळलेल्या मनाच्या स्थितींत कांहीं तरी विसाव्याची जागा हवी असते. अर्थात् घरीं परत आल्यावर जर का त्याला मनासारखी स्थिति आढळली नाहीं तर त्याला सहजच चीड यायची आणि मग त्याच्या हातून उणं आगळं वर्तन हें व्हायचंच. पण सुशील व घरंदाज बायकोनं तें सोसायलाच हवं. जर का तिनं आपलं तोंडाला तोंड दिलं आणि त्यामुळं नवऱ्याच्या लाथाबुक्या खाण्याची पाळी आली तर त्याचा बोल तिनं आपल्यालाच लावून घ्यावा हें बरं."

या बाबतींत आईचं अन् माझं मत जुळत नाहीं. मी तिला सांगितलं कीं आपल्या बायकोच्या प्रेमाचं असं चीज करण्याचा व उतावळेपणाचं प्रदर्शन करण्याचा भाऊसाहेबांचा हा आजचा पहिलाच प्रसंग नाहीं. तरी पण आईचं आपलें मत ठाम—ती

म्हणे कीं, "करायचं काय ? 'पावसानं झोडपलं अन् नवऱ्यानं मारलं, त्याची दाद ना फिर्याद'–याला कांहीं उपाय का आहे ? हें सोसलंच पाहिजे." पण अशानं माझ्या त्या असहाय मैत्रिणी-कडचा माझ्या मनाचा ओढा कमी होईना. यापूर्वीही माझं मत असंच होतं–व अद्यापही मला तसंच वाटतं आहे–पण तें याच्या अगदीं उलट आहे. तें हें कीं जें सोसतां येत नाहीं तें बरं कर-ण्याचा कांहीं तरी उपाय शोधून काढलाच पाहिजे. ह्यांत सारं आलं. कोडं,–त्याचं उत्तर–सारं त्यांतच. 'बक्षींकडच्या लग्नाला खास खास येतों' म्हणून लिहावयाचं. "खास खास."–मी इत-कंच ह्मणतं कीं या फुटणाऱ्या आनंदाच्या उकळ्यांचा शेवट अश्रुप्रवाहांत न होवो म्हणजे झालं !

आपली,

**कमला.**





# पत्र १० वें.



## दोन टोकांचा संयोग.

प्रियकरा, मी किनई, आज, कांहीं अशाच खुळचट गोष्टी लिहिणार आहे. कारण अशा किती तरी गोष्टी माझ्या पोटांत सांठविल्या आहेत. त्या एकदां समोर ओकल्याशिवाय कांहीं समाधान वाटणार नाहीं.

काल रात्रीं मला असं स्वप्न पडलं कीं स्वारी इथं आली अन् मला कडकडून भेटायचं झालं. त्या वेळीं मला आनंदाचं इतकं भरतं आलं कीं त्या भरांत झोंपेतून मी ओरडतच उठलें. अहाहा! त्या वेळच्या त्या अश्रूंचं काय सुख सांगायचं! सुखांत काय किंवा दुःखांत काय दोन्हीही प्रसंगीं अश्रु डोळ्यांत तयारच.

माझ्या मनांत असं आलं कीं प्रेम आणि तिरस्कार हे तर परस्परांचे वैरी. तेव्हां हे दोघेही एकाच ठिकाणीं राहणं कधीं तरी शक्य आहे काय? एखाद्यावर आपलं प्रेम असून त्याच वेळीं त्याच्याविषयीं मनांत तिटकाराही असूं शकेल काय?

या प्रश्नाचं उत्तर मी ‘होय’ असंच देईन. खोलच खोल अशा प्रेमाच्या तळ्यांत कधीं कधीं मत्सराचं बीज वाढीला लागून त्यापासनं तिरस्काराचं विषारी रोपटं नाहीं कां तयार होत? तळ्यांतलं पाणी प्यालं तर माणसाला स्वर्गांतलं सुख मिळतं, रोपटं

चाखलं कीं असह्य नरकयातना व्हायला लागतात. स्वर्ग आणि नरक हीं एकाच ठिकाणीं—कां आहे कीं नाहीं चमत्कार ?

प्राणेश्वरा, मी कधीं तरी आपला तिटकारा करीन काय ? आपणास माझा तिटकारा कधीं तरी करवेल काय ? नका हो नका. माझ्यावर आपण प्रेम करा. आणि मजवरचं तें आपलं प्रेम अखंड असूं द्या. माझ्या अंगीं कितीही दुर्गुण असले तरी आपण मजवर मायाच करा. माझं प्रेम आपल्यावर आहे त्याच्या अर्ध्यानं जरी तिकडचं मजवर राहिलं तरी त्या आपल्या प्रेमाची बरोबरी करणारं माणूस साऱ्या पृथ्वीवर आढळणार नाहीं. आपल्याच प्रेमाचा दर्जा वरचा लागेल.

हवी तर मला एखाद्या कोठडींत कोंडून ठेवा. वाटल्यास माझे हातपाय देखील बांधा. पण आपल्या प्रेमांत मात्र खळ पडूं देऊं नका. माझं प्रेम द्विगुणित होईल. मी आपल्यावर पूर्वींहून अधिकच प्रेम करीन. जी काठी, बाहेर जातांना हातांत असते तिच्या मुठीशींच मला खिळून टाका म्हणजे त्या योगानें तरी मला स्वतःच्या संगतिसुखाचा लाभ बराच वेळ घडेल. मला अंगठीचं रूप मिळालं तर त्याहूनही चांगलं. मग मला आपलं कायमचंच बोटावर राहतां येईल.

नाटेकरांच्या व त्यांच्या बायकोच्या संबंधांत लोक किती तरी वायफळ टीका नेहमीं करीत असतात. म्हणे नवरा, बायकोला आठ दिसांसाठीं दिखील, माहेरीं जाऊं देत नाहीं म्हणून दोघांत केवढं भांडण—व केवढा अबोला ! नाटेकर तरी काय करणार ? त्यांना बायकोवांचून क्षणभर करमत नाहीं, मग आठ दिवस

त्यांच्याच्यांनं कुठला धीर निघायला ! तिकडे आहे ना ठाऊक मूर्ती किती चत्मकारिक स्वभावाची आहे ती ! बायकोला कुलूप कोयंड्यांनीं कोठडींत बंदोबस्तींत ठेवल्यानंतर मग स्वारी बाहेर पडायची ! हें नाहीं कां प्रेम ? खास तेंच--आपल्या प्रेमाची किंमत केवढी मोठी याचा बिनतोड पुरावाच हा ! लोक याला "मत्सर" ह्मणून ह्मणोत पण मी तर त्याला 'प्रेम' हेंच नांव देतें. कदाचित् प्रेम व मत्सर हीं दोन्ही एकच असतील !

मी वहावत कां चाललें ? असं असेल तर मला वेडी ह्मणायची पण मला स्वतःची—अगदीं आपलीच समजून मजवर आपलं प्रेम मात्र असूं द्यायचं.--मजवरची आपली माया मात्र पातळ होऊं देऊं देऊं नये एवढंच काय तें माझं पदर पसरून स्वतः जवळ मागणं आहे.

आपली दासी,

**कमला.**





# पत्र ११ वें.

## भारती व तिची बहीण.

'घे रे माझ्या मागल्या'! फिरून प्रेमाचीच गोष्ट! आणि तें तरी प्रेम जगावेगळं—मेल्या माणसाचं जीवंत माणसावर असलेलं प्रेम! भारतीच्या बहीणीचीच गोष्ट. ती गोरटेली, गुबगुबीत पोर गेल्या सालींच जिचा नवरा वारला ती!

तिच्या मागं समंध लागला आहे म्हणे! अन् तो दुसरा तिसरा नाहीं कांहीं. स्वतः तिचा नवराच—संसार थाटायच्या विचारांत असतांनाच वारला तोच तिच्या मागं लागला आहे म्हणे! तें कां तर जीवंतपणीं त्याला वडील माणसांनीं बायकोशीं बोलूं दिलं नाहीं म्हणून! कां आहे कीं नाहीं सारा गमतीचा प्राकार? वयांत येण्याच्या पूर्वींच नवराबायकोची लहानपणीं भेट होऊं दिली तर त्याबद्दल लोक तुम्हांला हंसतात, बरं त्यांना बंदी केली तरी देखील दोषाचं खापर आहेच तुमच्या माथीं! या कोंडींतून बाहेर पडायला बृहस्पतीचीच अक्कल असायला हवी.

पोकळडोक्यांची मूर्ती इथंही आपली तयारच! या पोकळडोक्यांचा मेला अंतच लागत नाहीं. जिथं जिथं तरण्या विधवांचा किंवा लग्नाच्या मुलींचा वास लागेल, तिथं तिथं या पाजी माणसानं आपला शिरकाव करून घेतलाच ह्मणून समजावें. त्याचं नांव त्या घोटाळ्यांत ऐकूं यायचंच. रंगूकडनं थप्पड मिळाल्यापासनं

त्यानं आपल्या घराच्या आसपासच घिरट्या घालायला सुरवात केली; अन् त्याच दिवसापासनं या समंध-बाधेलाही सुरुवात झाली. साऱ्या जगाचा गाडा एका चक्रावर चालतोसा दिसतं !

ती पोर काय आपली गरीब गाय ! तिला बिचारीला मांत्रिकाकडे बळेंच पाठवितात. अन् तेंही ऐन मध्यरात्रीला जेव्हां चिटपाखरूंही नसेल अशा वेळीं अगदीं एकीकडच्या खोलींत किंवा त्या परसांतल्या पिंपळाच्या झाडाखालीं ! तिथं त्याच्या बरोबर वेळ काढायचा. तिलाही पण तें रुचतंसं दिसतं. समंधही वळलेला दिसतो. निदान कांहीं दिवसां पुरता तरी बंदोबस्त झाल्याचं दिसतं. जाणते, मांत्रिक, ऋषी, देवऋषी एकामागून एक, या थोड्याशा अवधींतच कित्ती तरी होऊन गेले असतील !

कोणी ह्मणतात, पिशाचबाधा बिधा हे सारे तिच्या आईचेच थेर ! असली तरणीताठी पोर ! नवरा गेल्यावर मागनं हें डोक्यावरचं कशाला बाळगायचं ? तसंच हें पोरीचं नटणं अन मुरडणं तरी आतां कशाला ? पोरीला नेसायलाही भारी भारी लुगडीं, अन् आंगभर दागिने कशाला ? हे घालून आपला हा श्रृंगार आतां कोणाला दाखवायचा ? चांगलेंचुंगलें खायला द्यायचं अन् मग पोर आंगापिंडानं भरली अन् तिच्या मागं जीवंत व मेलेलीं अशीं दोन्ही भुतं लागलीं तर मग दुसऱ्यावर बोल कां ? लोकांच्या तोंडाला हात कोणी लावायचा ?—आणि या नांव ठेवणाऱ्यांत अग्रेसर कोण हें कळलं कां ?—त्या मालचाटीणबाई—त्यांना आपल्या लहानपणाच्या गोष्टी—स्वतःला झालेली समंधबाधा—त्या वेळीं लोकांत त्यांच्याविषयीं चाललेली कुजबुज, या साऱ्या

गोष्टींचा त्यांना आतां विसर पडलेला दिसतो. ह्मणतात ना "चट्टी-पट्टीचा बोभाटा, झिपरी मारी झपाटा," त्यांतलाच हा प्रकार दिसतो. जग हें असें आहे !

माझा सारा ओढा तिच्या त्या गरीब बिचाऱ्या आईकडेच असणार ! मला कींनई तिची भारी कींव येते ! आपल्या मुलीचें हें असं प्रालब्ध फुटलेलें. आईला याहून अधिक दुःख तें काय असायचं ? घरांत हें असं दुःख——आणि लोकांत होणारा हा बभ्रा व चोहींकडे चाललेली कुजबूज—याच्या लाजेनं बाहेर तोंड काढायची सोय नाहीं. यामुळं तिला अगदीं मेल्याहून मेल्या-सारखं झालं आहे. पण तसं पाहिलं तर बाई मोठ्या धीराची ! त्या मूर्ख जांवयानं दुसरं लगिन केल्यापासनं तिनं आपल्या मुलीला कांहीं सासरीं पाठविली नाहीं. कसला खुळा माणूस तरी तो ! एक बायको होती ती नव्हती का पुरेशी ?

त्या विचित्र लग्नाच्या मुळाशीं काय होतं तें मीं कळविलं आहे का पूर्वी आपल्याला ? त्यांत आतां गुपित असं कांहींच राहिलं नाहीं. भारतीला, तिच्या सातव्या वर्षीच, आईबापांनीं चांगल्या पैसेवाल्याच्या घरांत लोटून दिली. त्या लक्ष्मीधराची आई—नवऱ्याचं लचांड आतां तिच्यामागं राहिलं नाहींच——तिनें आपल्या भाचीशींच, त्या वेडगळ मुलाचं लग्न लावून दिलन् ! मुलगी पण मुलगी—कसली मेली घाणेरडी अन् वेडीविद्री वय असेल अकरा वर्षांचं——अशा त्या कैकाडणीशीं लगीन लावलन् तिनं. हेतू हा कीं सारा पैसा आपल्याच घरांत रहावा. ह्मातारी मोठी जहांबाज ! तिनं भारतीच्या आईबापांच्या व नातेवाईकांच्या

लांबवरच्या धोरणाला अगदीं कवडीमोल करून टाकलन्. कशा पण त्यांच्या हातावर तुरी दिल्या ! पण या दोघांच्या झुंजींत त्या बिचाऱ्या पोरीच्या जिवाचा मात्र उगीच चेंदा ! तिच्या वरनं ' मुलगे व बेडूक' या गोष्टीची मला आठवण झाली. खेळणारांना जरी त्यांत मौज वाटली तरी इकडे त्या बेडकांचें मात्र मरण ओढवलें ! लक्ष्मीच्या होमकुंडांत दिलेले हे नरबलीच ह्मणायचे ! भारतीची याप्रमाणं ही केविलवाणी झालेली स्थिती पाहून कोणाच्या डोळ्याला पाणी येणार नाहीं ?

लोक ह्मणतात, हें तिच्या कपाळींच लिहिलं होतं–अगदीं ब्रह्मलिखित. आह्मां हिंदू लोकांचं हें अगदीं अखेरचं शस्त्र. केलेल्या पापाबद्दलचं हें समाधान ! जाणून बुजून एखादी गोष्ट करायची अन् मग त्याचं खापर प्रालब्धावर फोडायचं. आतां भारतीच्या दुर्दैवाचा कळस म्हणजे तिला त्याच नवऱ्याच्या घरीं राहायला पाठवायचं. आणि तिनं तिथं आपल्या कनवाळू सासुबाईच्या व शहाण्या नवरोजीच्या हातांखालीं बटकीसारखं राबायचं तरी एक किंवा तसं करायंच नसेल तर तुरुंगाची वाट धरावी– अशी सक्ती करायला कायदा आ वासून तयारच !

बाईची रवानगी तुरुंगांत ? होय तशी स्थिती आहे खरी !! कोणी म्हणेल आमचं ते कायदेपंडित याकडे लक्ष देत नाहींत काय ? आणि नामदार मंडळी काय करतात बरें ? कारण त्यांच्या इतकी दीर्घप्रयत्नी, सार्वजनिक कार्यासाठीं आतुर झालेली, धोरणी अशी मंडळी, शोधूं जातां सांपडायची नाहीं. त्यांच्या एकंदर खटाटोपावरूनच पहा ना ! निवडणुकीच्या

वेळीं रात्रीचा दिवस केला, पैशाकडे पाहिलं नाहीं, गुमास्त्यांची अन् दलालांची तर मालिकाच लावून दिली होती—मतें मिळवायला, व लोकांची मनं वळवायला. शिवाय स्वतः विनवण्या करून, हातपाय जोडून, शिफारशी भिडवून, तारा करून, सारांश, वाटेल तो उपाय करून, स्नेह्याकडून, पडस्नेह्याकडून, पडस्नेह्यांच्या पडस्नेह्यांकडून वशिले भिडवून ते आपला कार्यभाग साधीत असतात! हें सारं केवळ लोककल्याणाखातर! नाहीं तर त्या बिचाऱ्यांचा स्वतःचा काय फायदा? कोणी निवडणुकीला फार्स ह्मणून ह्मटलं किंवा यांना 'नामदारी'साठीं हपापलेले ह्मणून टोमणा मारला तर मारा ना बापडे! बोलणारांचं तोंड कसं धरवेल? पण सारेच लोक असे कसे असूं शकतील? अंतःकरणाच्या कळकळीनं लोकांच्या कल्याणासाठीं जीवापाड श्रम करून झटणारीं अशींही कांहीं माणसें आहेतच.

स्वतः भारती तरी काय कमी मात्रा? आपल्या आईला अगदीं शोभणारी मुलगी! तिनं परत सासरीं जाण्याचं साफ नाकारलन्. पुढें मग कांहीं कां होईना. असं ऐकतें कीं तिचा वकिलांनीं—त्यांत एक चांगला नामांकितांपैकीं आहे—तिचा पक्ष उचलला. त्यांनीं फी न घेतां वेळ पडेल तेव्हां कोर्टांत तिच्या तर्फे काम करण्याचं कबूल केलं आहे. पोकळडोक्यासारख्या रिकामटेकड्या वकिलांची गोष्ट असो. त्यांना पैशाशिवायही काम मिळवायची खटपट करावी लागते. पण या एवढ्या मोठ्या वकिलानं हें काम हातीं कसं घेतलं, याचं मला मोठं कोडंच पडलं आहे. कारण मुलुखमैदानसारख्या तोफांना भरभक्कम दारूगोळ्यांचा

पुरवठा न केला तर त्या जशा मुक्याच राहायच्या त्याचप्रमाणें असल्या या वकिलांना चांगलीच फी भरल्याशिवाय कार्यभाग साधायचा कसा ?

त्या गरीब गाईची त्यांना कींव येऊन—मोठ्या शुद्ध भावानं त्यांनीं हें काम हातीं घेतलं असं दिसण्यांत तर दिसतं. गरीब गाय ! न जाणो, तिच्या हातनं, मागच्या जन्मीं असं कोणचं पातक घडलं कीं त्याच्या योगानं तिला या ऐन उमेदीच्या दिवसांत कोपऱ्यांत डोकं खुपसून बसायची पाळी आली. आम्हां बायकांची दिखील स्थिती एखाद्या बाहुलीसारखीच आहे म्हणायची. ती आवडेनाशी झाली कीं तिला बापडीला कोना कोपराच जवळ करावा लागतो ! !

देव करो, अन् त्या बिचाऱ्या भारतीला साह्य करण्याची सुबुद्धि खऱ्या सज्जन पुरुषांना होवो. तसंच सर्व बायांचे तोंडून तिच्या त्या केविलवाण्या स्थितीकडे पाहून तरी चांगले उद्गार निघोत आणि तिच्यामागं ज्या ह्या आपत्ती हात धुवून लागलेल्या आहेत त्या सर्वांतनं ती सुखरूपपणें पार पडो एवढीच माझी परमेश्वराला प्रार्थना आहे.

आपली,

**कमला.**





# पत्र १२ वें.



## बनूताई.

किती भयंकर गोष्ट ! त्या गोष्टीच्या विचारानं माझ्या हातांतनं लेखणी गळून पडते. धोंडोपंतांचं कुटुंब आटोपलं. बाई चांगली घट्टीकट्टी आणि काल संध्याकाळ पर्यंत अगदीं खणखणीत होती. रोगराई तर असोच पण तिचा कान दिखील ऊन झाला नव्हता पण आज पहाटेस उठल्या बरोबर खबर येऊन पोहोंचली कीं, 'बनुताई वारल्या.' वारल्या ह्मणजे ?—साताला जेव्हां बातमी समजली तेव्हां आह्मांला कांहीं ती खरीशी वाटेना ! पण मेल्या-बद्दलची–अशी खोटी कंडी कोण पिकविणार ? आणि तीही बनूताईसारख्या सालस माणसाच्या संबंधांत. पण इकडे पहाल तर त्यावेळीं मसणांत गोंवऱ्यांची राख होऊन त्या धिप्पाड शरीराचा मागमूसही उरला नव्हता.

ही बातमी ऐकून लोकांना भारी आश्चर्य वाटलं. आणि तसं वाटणं अगदीं साहजिक होतं. कारण बाईचं वय कांहीं मरण्यासारखं नव्हतं त्यामुळें गांवांत, जिकडे तिकडे, कुजबूज सुरू झाली. जो तो ह्मणूं लागला "कां हो हें कसं झालं ? अहो, काल दुपारला मीं तिला त्या विहिरीचें पाणी शेंदतांना पाहिली अन् रात्रीं ह्मणे बाई आटोपली ! हा काय चमत्कार बुवा ?" दुसरा डोळे मिचकावीत हळूच ह्मणतो, "धोंडोपंतांची आपल्या कुटुंबावर भारी

भक्ति—त्यामुळं त्या बाईला देहभान नाहींसं झालं असावं." तर तिसरा ह्मणतो—" अहो याच्या मुळाशीं कांहीं तरी काळंबेरं आहे खास !" अशा एक का दोन-ज्याच्या तोंडाला जें येईल तें तो बोलतो ! लोकांच्या तोंडाला आळा घालणार कोण ? राहतांपैकीं दोन गोष्टी टिकून राहिल्या. नातेवाईकांचं आणि डॉक्टराचं असं ह्मणणं पडलं कीं, बाईच्या काळजांत एकाएकीं रात्रीं कळ निघून तिचा जीव गेला. पोलीसचंही मत सुदैवानं असंच आहे. हें बरंच झालं ह्मणायचं नाहीं तर धोंडोपंतांच्या मागें जर का पोलिसाचं सुदर्शन लागलं असतं तर त्यांची धडगत नव्हती. लोकांचं मत मात्र याहून अगदीं निराळं. धोंडोपंतांच्या त्रासाला कंटाळून बागेंतल्या विहिरींत तिनें जीव दिलान् असं लोक ह्मणतात. 'सबसें प्यारा जीव,' पण केव्हां केव्हां या संसारांतल्या व्याधींनं माणसाला तो दिखील नकोसा होतो. तिची नणंद तिला अगदीं पाण्यांत पहात असे. आपल्या भावजयीच्या विरुद्ध नाहीं नाहीं त्या खोट्यानाट्या गोष्टी सांगून तिनं आपल्या भावाचं मन बिघडविलन्. यांत तिला स्वतःला काय फायदा झाला असेल तो असो. अशा बायांना दुरूनच हात जोडावेत अन् काय ? बरं तिच्या नवऱ्याला तरी कांहीं विचार असायला हवा होता. पण तोही तसलाच अविचारी आणि स्वभावानं अगदीं हिरवट. त्यानं बहिणीच्या चिथावणीनं आपल्या बायकोला वाटेल तशी चोपायची; आणि काल रात्रीं तर त्यानं बायकोला इतका मार दिला कीं शेवटीं तिला विहीर आड करावी लागली.

आतां माझ्याच्यानं यापुढें लिहवत नाहीं. तिच्या नणंदेच्या व नवऱ्याच्या दुष्टपणाचे विचार व माझ्या मैत्रिणीचा सालस

स्वभाव व तिला जन्मभर भोगाव्या लागणाऱ्या अपेष्टा या आठवून माझं डोकं त्याच विचारांनीं अगदीं भणभणून गेलं आहे. हात कांपायला लागला. त्या निरपराधी पण प्रेमळ, करारी—बाणेदार—पण नम्र स्वभावाच्या अशा त्या माझ्या मैत्रिणीची मूर्ती माझ्या डोळ्यासमोर खळते आहे. बये बनू, आज तूं आपल्या लाडक्या—जिवलग मैत्रिणीला सोडून एकटीच कुठें ग गेलीस ? बाळपणची तुझी ती अल्लड—किंबहुना द्वाड वृत्ती व पुढच्या आयुष्यांत तुला भोगाव्या लागलेल्या अपेष्टा—व त्यांमुळें बनलेली तुझी दुःखी कष्टी वृत्ती, या दोन्ही आज तुझ्या मरणानें नाहींशा झाल्या. ही तुझी गरीब मैत्रीण आज तुझ्यासाठीं नुसतीं आंसवें गाळण्यापलीकडे काय करणार ? तूं आतां कधींच परत येणार नाहींस ना ?

इथं नसला तर निदान वर स्वर्गलोकांत तरी गरीबांचा वाली कोणी आहे काय, कीं जो खऱ्या खोट्याचा निवाडा करील व या दुष्ट लोकांना चांगलंच शासन करील ? या इथं तर मला मुळींच आशा दिसत नाहीं. जिथं पैसा हीच मुख्य शक्ती तिथं इतर साऱ्या शक्ती बिचाऱ्या लटपटायच्याच !

आपली,

कमला.





# पत्र १३ वें.



## पोकळडोक्यांची यादी !

**मा**णसाला दुःखाचा विसर किती लौकर पडतो ! समुद्रांत येणाऱ्या लाटांवर ओढलेली रेघ जशी हात काढतां क्षणींच नाहींशी होते, त्याच प्रमाणें माणूस संसारांत लागला कीं आपलं पहिलं दुःख पार विसरून जातो. कालच्या त्या हृदयद्रावक प्रसंगाचीही आठवण बुजून लोक आपआपल्या संसारकार्यांत गर्क होऊन गेले. जणूं काय कालचा प्रकार घडलाच नाहीं. एकच दिवसाची गोष्ट कशाला, वर्षांमागून वर्षें भरकन निघून जातात. कालाचा क्रम आपला अबाधित सुरूच आहे.

पोकळडोक्यांचे दोन हातांचे चार हात झाले एकदाचे ! गृहस्थाला पुन्हां बोहोलं गाठायची कोण घाई झाली होती म्हणतां ! अन् त्यासाठीं त्यांची तयारीही पण तशीच जबरदस्त. जिथें कुठें म्हणून लग्नाजोगी मुलगी असेल तिथें यांच्या खटपटीला झालीच सुरुवात. आणि आपल्याच जातीच्या विधवांपैकीं देखील एखाद्या ' योग्य ' विधवे बरोबरही संबंध जोडायला त्यांची तयारी होती. हें सोंग एवढ्यासाठीं कीं आपल्यांत सुधारणेचें वारें आहे असें लोकांना 'दिसावें.' पण त्यांत एवढी खबरदारी मात्र बाळगायची कीं त्यापासनं स्वतःला कांहीं धक्का न पोहोंचेल. मुली पाहण्याच्या सबबीवर त्यांनीं कित्येक कुलीन घराण्यांत आपला प्रवेश

करून घेतला. पण प्रत्येक ठिकाणीं शेवटीं स्वारीची चांगलीच शोभा होऊन त्यांना परतावं लागलं. पण त्याचा तरी स्वारीला कुठें विधिनिषेध ? माणसानं एकदा का लाज सोडली कीं त्याला बाराही वाटा मोकळ्या, अन् तसें पाहिलें तर स्वारी नांवाप्रमाणें खरोखरच पोकळ डोक्याची. नुसता त्याचा मिजास पाहून घ्या तेवढी. नंदीबैलासारखा " रावसाहेबाच्या नांवाचा डंका " म्हणून म्हटल्याबरोबर इकडे स्वारी मान हलवावयाला लागायची. ते ' लटपटे ' आहेत ना—तिकडच्या पहाण्यांतले—त्यांच्या सारख्या अट्टल सोद्यांत व यांच्यांत मनस्वी अंतर !

आपणास योग्य बायको ह्मणजे तिच्यांत कोणकोणते गुण पाहिजेत याची त्यांनीं एक चांगली यादच रंगविली होती. आतां ती पाहिली तर कोणी असं ह्मणेल कीं, अशी बायको मिळणं अगदीं अशक्य. पण मी ह्मणतें तसं जरी नसलं तरी असली बायको मिळाली तर ती—' अलौकिकच ' ह्मणायची. पण त्यानं तरी कां असं करूं नये ? हो ! चांगल्या होतकरू वकीलांत त्यांची गणना होते आहे, पुढें चांगलाच भाग्योदय होण्याचा—जज्जाबिज्जाची जागा मिळायचा संभव, ह्मणजे विशेषशी यातायात न करितां चार पैसे मिळवून ह्मातारपणचे दिवस चांगले सुखासमाधानांत घालवितां येण्याची उमेद. अशीं साधनं असतांना—व त्याहून आपला चेहरा मोहरा चांगल्यापैकीं आहे अशी लोकांची नसली तरी स्वतःची समजूत असतांना बायको चांगल्याचपैकीं नको का ? तसं पाहिलं तर वय दिखील कांहीं फार नाहीं. हो ! शिंगं मोडून वासरांत शिरायला लागल्यावर माणसाचं वय पुढें जाईल

कां मागें येईल ? मला राहून राहून ज्या गोष्टीचं नवल वाटतं ती ही कीं, लोकांचा याच्या बोलण्यावर विश्वास तरी कसा बसतो ? पण लोकांचं काय अडलं आहे तारखा मिळवून पहात बसायला? बाकी त्यांच्या सांगण्याप्रमाणें जर कोणी हिशोब करायला तयार झाला,तर स्वारी जन्माच्या आधींच बाराखड्या शिकली असावी असं दिसतं! असेलही.नाहीं कशावरून ह्मणावं! पण असल्या दिव्य रत्नाला तसंच कोंदण शोभणारी अशी स्त्री या मृत्युलोकांत कशी सांपडावी? तिचे गुण तर पहा. चांगली चलाख बुद्धिमान असावी, तिला गातां यावें. गणितांत देखील तिची चांगलीच गती पाहिजे. रंगानें गोरी व गुणवान असावी. कुलीन घराण्यांतली असून घरची सधन असावी. नाक फार लांब नाहीं व चपटेंही पण नाहीं. डोळ्यांत पहिल्या कुटुंबासारखं पाणी असावं—इत्यादि इत्यादि. हे गुण आपल्या भावी पत्नींत असावेत अशी त्याची अपेक्षा. ती वायफळ किंवा फाजील कशी ह्मणायची ? पहिल्या कुटुंबाचं यांच्यावर अति प्रेम असे—ह्मणून या नव्या बायकोच्या जोडीची जरी ती नसली तरी पण तिच्या गुणाचा पाडा जो भेटेल त्याच्या समोर वाचल्याशिवाय यांना चैनच पडत नसे. पहिलीच्या ऋणांतनं मुक्त व्हायला त्यांना एवढाच काय तो मार्ग आतां उरला होता.

या पोकळडोक्यांच्या यादीचा प्रत्येकाला वीट आला होता. ती याद आपण स्वतः गांवांत फिरविली होती व बाहेर गांवींही आपल्या इष्टमित्रांकडेस ती पाठविली होती. जर एखादं योग्य ठिकाण आढळलं तर मला जरूर कळवा, असं त्यांनीं आपल्या

नातेवाईकांनाही पण सुचवून ठेवलं होतं. ती सारी मंडळी अगदीं त्रासून गेली होती. कोणीं सांगितलेलं यांच्या मनाला यायचं नाहीं, व मनाजोगी बायको मिळेपर्यंत यांचा त्यांच्या मागचा लकडा निघायचा नाहीं. अशी कांहीं साऱ्या मंडळींना मोठी अडचण उत्पन्न झाली होती. या योगानें जेव्हां का पोकळडोक्यांनीं आपली नवरी पसंत केल्याचं कळलं तेव्हां लोकांना अंमळ बरं वाटलं. लग्न अगदीं तांतडीनें व्हायचं असं कळलं तेव्हां लोकांना जरा आश्चर्य वाटलं खरं पण त्याही पेक्षां त्यांची पसंत केलेली मुलगी आहे तरी कशी हें पहायची उत्सुकता जास्त वाढली होती.

शेवटीं आज सकाळला एकदाचं लग्न पार पडलं. चार घटकेंत सारं लग्न आटोपलं. कां, तर ह्मणे रावसाहेबांची पहिल्या कुटुंबाविषयींची आस्था हें त्यास कारण ! आहे कीं नाहीं मौज ? निमंत्रणांना फाटा. वरात, गाजावाजा, थाटमाट या साऱ्यांनाही रजाच. मुलीची आजी कायसंसं ह्मणे कुरकुरत होती कीं रावसाहेबांचं दुसरं असलं तरी नातीचं तर हें पहिलंच कार्य ना—ह्याची वर्दी थेट जांवयापर्यंत गेली होती—पण ते कसले त्या ह्मातारीच्या भुणभुणीला जुमानतात ?

मनुष्यमात्राला मोकळं झाल्यासारखं झालं. मुलीचं वय केवळ अकरा वर्षांचं असं जेव्हां का लोकांच्या नजरेस आलं तेव्हां त्यांनीं रावसाहेबांची चांगलीच पूजा उतरली. पण याच्यावर ते नुसते फिदी फिदी हंसले मात्र ! ऐकण्यांत असं आहे कीं, हिशोब करण्यांत मुलीनं जो चुणचुणीतपणा दाखविला तेवढयाच वरनं

रावसाहेबांची मर्जी झाली बहाल अन् काय ? झालं त्यांनीं ताबडतोब आपली सोयरीक ठरविली. उदाहरणं होतीं साध्या बेरजांचींच. आणि तीं सोडवतानांही चुका झाल्याच. पण रावसाहेब भाळले खरे. यावरनं कोणालाही असं वाटेल कीं, देवानं या जोडप्याला सुखांत ठेवावं, मुलीचं पुढचं आयुष्य सुखांत जावं व आपल्या नवऱ्याच्या आंगांत असलेला गाबाळ-ग्रंथीपणा भरून काढण्याचं सामर्थ्य तिला देवानं द्यावं, एवढंच ह्मणायचं !

आपली,

कमला.





# पत्र १४ वें.

## पिंडावरचे कावळे.

बनूताईंची क्रिया सुरू झाली. आमचे धोंडोपंत कसले खप्पी--ते स्वतः कशाला पडतात या यातायातींत ?—त्यांनीं क्रिया करण्याचें काम सगळें ब्राह्मणावरच सोंपविलें. ही व्यवस्था, खरंच, फार नामी ह्मणायची ! स्वतःची सोय आणि लोकांचा संतोष, अशा दोन्ही गोष्टी यांत साधतात. पण मला सांगा त्यानं तरी काय करायचें ? बापड्याची बायको गेली. तिच्या मरणाचें दुःख त्याला इतकं असह्य झालं कीं शेवटीं त्याला तिची क्रिया दुसऱ्याच्या हातून करवावी लागली ! भारीच कोंवळं अंतःकरण ! दुःखाचा खरा खरा उमाळा ह्मणतात तो यालाच !

एक चमत्कारिक—अतिचमत्कारिक गोष्ट माझ्या कानीं आली आहे. चमत्कारिक असली तरी पण ती खरी आहे. आज सकाळीं ह्मणे पिंडाला कावळा शिवेच ना.

मंडळींनीं आपल्यापरी हवी तेवढी खटपट करून पाहिली, पण फुकट. शेवटीं त्या मिजासखोर नवऱ्यानं जमलेल्या त्या साऱ्या मंडळींच्या देखत आपला ताठा एकीकडे ठेवून आपल्या वारलेल्या बायकोच्या आत्म्याला वचन दिलं तेव्हां काम झालं. तिला अगदीं अचानक मरण आल्यानं तिचा जीव साहजिकच संसारांत व विशेषतः पोराबाळांत राहिला. त्यामुळें जेव्हां का त्यानं तिच्या

त्या जीव का प्राण मुलाचें पालनपोषण जीवाभावानं—अगदीं ती जीवंत असतांना झालं असतं तितक्याच काळजीपूर्वक—करायचं अन् सवतीचं वारं पडूं देणार नाहीं ह्मणून त्यानं कबूल केलं, तेव्हां कावळ्यांची झुंडच्याझुंड त्या पिंडावर तुटून पडली. त्यांनीं शेवटीं एक शीत दिखील शिल्लक ठेवलं नाहीं. हा प्रकार पाहून साऱ्यांना भारी नवल वाटलं. देवधर्म झूट ह्मणणाऱ्या तिच्या त्या नवऱ्याची तर भीतीनं गाळणच उडाली.

विचार करायला लागलं तर किती चमत्कारिक गोष्ट ही ! ह्मणजे असंच ह्मणायचं कीं, बनूचा जीव त्या पिंडाभोवतीं सारखा घिरट्या घालीत होता. अन् त्यानंच कावळ्यांना शिवूं दिलं नाहीं. शेवटीं, नवऱ्याला तिच्या मनाप्रमाणें कबूल करावं लागलं. आमची कांहीं शिकली सवरलेली मंडळी आपल्याला 'सुधारक' ह्मणून ह्मणवून घेतात अशांपैकीं कांहीं कांहीं मंडळी आपल्या यच्चयावत् धार्मिक विचारांची, आचारांची किंवा संस्कारांची सारखी टवाळी करीत असतात ! कोण हा उतावळेपणा ! मी ह्मणतें निव्वळ अविचारीपणा ! हा सारा परिणाम—त्या चुटपुटत्या ज्ञानाचा !

आपल्या सर्वज्ञतेची माणसाला केवढी घमंडी ! माणसाच्या आयुष्यांत अशा थोड्या का गोष्टी घडत असतात, कीं ज्यावरनं त्याला या दैवी शक्तीची साक्ष पटेल. त्या पाहून आपण लाजेनें मानच खालीं घालावी. त्या क्षुद्र कावळ्यांकडे तरी पाहून आपण आपल्या रिकाम्या प्रौढीला रजा दिली पाहिजे. यावरनं असं ह्मणायचं कीं कावळ्यासारख्या यःकश्चित् जीवाला जी गोष्ट दिसते ती

स्वतःच्या शहाणपणाच्या गुर्मींत असलेल्या माणसाला कांहीं दिसत नाहीं. देवानं यांना अकला दिल्या आहेत. पण त्यांचा उपयोग हे करितील तेव्हां ना! आणि समजा केला तरी आपल्या सर्वज्ञतेच्या ताठ्यानं दृष्टी बिघडलेली तिला खरी गोष्ट दिसणार कुठून? यांची सारी दारमदार त्या तोलायच्या काट्यावर. यांच्या डोळ्याला दिसलं नाहीं कीं मग 'तें सब झूट.' इतर सारे लोक म्हणजे खुळ्यांचा बाजार! पण यांना हें कळेना कीं आपल्या या इवल्याशा बुद्धीच्या बाहेर—अदृष्ट-गूढ अशा किती तरी गोष्टी आहेत. त्यांच्यापुढें तुमच्या या अल्प सामर्थ्याचा काय पाड? पण जो तो म्हणतो मी मोठा!

पण प्रियकरा, या विचारपरंपरेंत माझं मन इतकं गढून गेलं आहे कीं, मला स्वतःचंही भान राहिलं नाहीं म्हणून मी येथेंच थांबतें.

आपली,

**कमला.**





# पत्र १८ वें.

## जागा भरून काढली.

शिव शिव ! कांहीं कांहीं लोक किती तरी निर्दय असतात ! आणि कसलीं माणसं हीं ? यांना लाजही नाहीं वाटत. बायकोच्या मरणाला चार दिवस दिखील झाले नसतील तोंच इकडे दुसरं स्थळ आणि लग्नाचा मुहूर्त दिखील ठरवून पार ! सकाळला तिरडी अन् संध्याकाळला बाशिंग ! कोण घाई ही ? कांहीं तरी माणुसकी ? या दोन्ही गोष्टी, एकाच वेळीं काढायला, अगदीं तिऱ्हाईत माणसाला दिखील लाज वाटेल. पण त्याच गोष्टी यांनीं प्रत्यक्ष जुळवून आणल्या तेव्हां आहे कीं नाहीं यांची कमाल ? क्रिया आटोपायला अजून ५।६ दिवस बाकी आहेत तोंच यांची लग्नाची बोलाचाली झालीसुद्धां !

सारी खटपट वडील मंडळींनीं चालविली आहे. आणि त्यांनींही पण पुढचं कार्य अगदीं ताबडतोब करायचं ठरविलं आहे. कारण ही जी मध्येंच खिंड पडली ती भरून काढण्यांत मोठें पुण्य आहे हेंच ! धन्य आहे तुह्मा धर्मात्म्यांची न् काय ? ही असली घाई जिनं माणुसकीला बट्टा आणला तिनं पुण्य लागतं काय ? छे ! छे ! छे ! माझी तर इथें अक्कलच गुंग होऊन जाते.

लग्नाचा मूहूर्त येत्या आदितवारचा धरला आहे. त्याच दिवशीं बनीच्या मरणाचा चौदावा दिवस पडतो. शुद्ध श्राद्ध

आटोपल्यावर या किंवा दुसऱ्या कोणत्याही मंगल कार्याला कसली अडचण उरली ? अन् क्रिया जर दुसऱ्या ब्राह्मणानें केली तर मग स्वतः धोंडूभाऊंना लग्न करायला दुसरी कशाचीच हरकत नाहीं ! अन् मुलगी कोण आहे हें कळलं कां तिकडे ?

ती मालचाल्यांच्या लांबच्या संबंधाची पोरकी पोर—१० वें असेल नसेल—ती बरं का ! ही त्यांच्या पहिल्या कुटुंबाच्या मावशीची लेक कायशीशी आहे ह्मणे. आणि मौज ही कीं मिऱ्याएवढी पोर ती पहिल्याच बोळवणीला नवऱ्या बरोबर राहावयाची. कां तर नवऱ्याची सेवा करायला आणि घरचा मोळा लागायला !! धन्य आहे अशा लोकांची !!!

आपली,

कमला.





# पत्र १६ वें.



## अप्सरायुग्म.

गेल्या सबंद आठ दिवसांत तिकडचं पत्रच नाहीं; त्यामुळें मी मागचेंच पत्र आपल्या मेजांतनं काढलं व त्याचींच पारायणं चालविलीं.

तिकडच्या त्या जहागिरदारांच्या मुलींचं वर्णन करतांना लिहायचं झालं होतं कीं, ह्या ' मोठ्या मोहक, सुसंस्कृत, व खाशा तय्यार झालेल्या ' आहेत. त्या तरुण मुलींचें तें चटकदार वर्णन वाचून मला कीं नाहीं भारी आनंद झाला. पण गडे त्यांचा तो अलगुजा ऐकायला मी असायला पाहिजे होतें ह्मणून जें ह्मटलें तें कशासाठीं ? माझ्या आठवणी ऐवजीं काशीच्या सासूची आठवण व्हायला हवी होती. ह्मातारी कसली खाष्ट, तिनें आपल्या सुनेला गाणें ह्मणण्याची बंदी केली इतकंच नव्हे, तर तिच्या नवऱ्यानं तिला एक वीणा आणून दिला होता त्याचे तिनं तुकडे तुकडे कींहो केले. तिला दाखविलं असतं तर न जाणो आपल्या कृत्याचा तिला कदाचित् पश्चात्ताप झाला असता व बिचाऱ्या काशीच्या मागचा ताप थोडासा तरी कमी झाला असता.

खरंच—स्वारी माझ्यासारखी दुःखी कष्टी नाहीं—मोठ्या आनंदांत आहे हें पाहून मला फार सुख होतं. तिकडचा ज्यांत

संतोष त्यांतच माझा संतोष. जें तिकडे सुख तेंच माझंही सुख. मला तसा आनंद दुसऱ्या कश्शानं होत नाहीं. मी—इतक्या दुरून स्वत:ची कशी तरतूद ठेवणार, व इतक्या दूरनं तिकडचं कसं मन रमविणार ? एवढ्याचसाठीं तिकडची करमणूक करणाऱ्या त्या जहागिरदारणींचे—तिकडल्या अप्सरांचे मी मनापासनं आभार मानले. स्वारी इथं येईपर्यंत वीण्याला ह्मणून हात लावायाचा नाहीं असा म्या आपल्या मनाशीं निश्चयच केला आहे.

आपली,

**कमला.**





# पत्र १७ वें.

## फिरून रंगूची भेट.

प्रियकरा, मला कांहीं तरी होतं आहे खास !—काय ह्मणून सांगूं ?—कांहीं तरी ज्याला नांव ना ठाव. हें कल्पनेचं पिशाच सारखं हात धुऊन माझ्या पाठीस लागलं आहे. याच्या पायीं शेवटीं चळ न लागो ह्मणजे झालं. मला तर याचीच मोठी काळजी येऊन पडली आहे.

सासूबाईंनीं इकडचं नांव " मनोहरपंत " किंवा याच्याच सारखं कांहीं तरी ठेवायला हवं होतं. माझ्या या स्थितीचा बोल माझ्यावरच तरी लावूं नये. माझ्या मनांत ज्या नाना तऱ्हेच्या शंका कुशंका येतात त्यांना मी आंतल्या आंत दडपून टाकतें. फुलपांखरासारखं आनंदानं आपल्याच नादांत बागडणाऱ्या जगा-कडे मी आपली दृष्टी देतें आणि बळेंच आनंदी वृत्ती आणण्याची धडपड करतें—पण थोडयाच वेळांत पुन्हां कल्पना जोरानं उस-ळतात व जसं धुक्यामध्यें इतर वस्तू बुडून जातात त्याप्रमाणें माझं मन कल्पनांनीं वेडें होतें व देहभान नाहींसें होतें.

दररोज नव्यानव्या गोष्टी ज्या बाहेर पडतात, त्यांवरनं खास आपला दोघांचा हा जुळलेला संबंध पुष्कळांना कांहीं आवडत नसावा. म्हणून ते वाटेल ती नालस्ती करीत असतात. आपली गंगा—तिकडच्या अगदीं भरंवशाची गंगा—तीच लोकांत वाणं वाटीत फिरत होती. तिनं मला फुलपांखरांत ओढलं असून तिचं

म्हणणं अशा हलक्या कुळांतल्या फुलपाखराबरोबर आपण काय म्हणून संबंध जुळवलात ? झालं हें कांहीं चांगलं काम नाहीं झालं, हें तिच्या म्हणण्याचं सार ! हा तिचा कांगावा पाहून मला कसं-संच होतं. नारायणा! कोण खोडसाळ दुनिया ही ! किती अनुदार लोक हे !! केवळ मत्सरानें लोकांच्या कुटाळक्या न करणारे लोक जगांत किती थोडे ? आणि त्यांतही स्वतःला सुख नसतांना दुस-ऱ्याचं हित चिंतणारे तर लोक किती निघतील ?- त्याहूनही थोडे.

प्राणेश्वरा, असलीं कुसकीं नासकीं बोलणीं ऐकण्याची आतां मला चांगलीच संवय झाली आहे. पण हें सारं–व याहूनही आण-खी घोरपडी यायच्या असल्या तर त्या मी कशाच्या बळावर सोस-णार हें ठाऊक आहे काय ? जोंपर्यंत तें दिव्य औषध–ती संजी-वनी मात्रा–इतर सर्व गोष्टींहून जगांत मला ज्या गोष्टीची अधिक किंमत असे तें आपलें प्रेम—तें जोंपर्यंत आहे तोंपर्यंत वाटेल तितकी माझी कुणीं नालस्ती केली किंवा कितीही लावून बोललें तरी त्याचें मला मुळींच दुःख वाटायचं नाहीं. स्वतःचें प्रेम, –जीवितेश्वरा–इकडच्या त्या शुद्ध प्रेमाखेरीज मला दुसऱ्या कश्शाचीच भूक नाहीं !

वा ! काय चांगला योग पहा! ही समोर आमच्या रंगाबाईची स्वारी येत आहे. स्वारी पण वेळेवर आली. तिच्या त्या गम-तीच्या व मार्मिक बोलण्यापासनं मनाला कांहीं विरंगुळा पडेलसं वाटतं–पहायाचं तें आतां. एवढ्यासाठीं मला कीं नाहीं आपल्या लेखणीला आतां आवरतंच घेतलं पाहिजे. झालंच.

आपली,

कमला.



# पत्र १८ वें.



## रंगूची फिरून भेट.

परमप्रिय प्राणेश्वरा,—काल तिसऱ्या प्रहरीं रंगूची जी भेट झाली, ती अगदीं वेळेवरच झाली ह्मणायची. अलीअलीकडेस मला कसंसंच होतं. मनाला कसला उल्हास ह्मणून वाटत नाहीं. आणि जर का तिची काल गांठ पडली नसती आणि तिच्या बरोबर तो गमतीचा संवाद झाला नसता, तर, मला वाटतं, मनाची खिन्नता जास्तच वाढली असती.

रंगू मोठी चाणाक्ष. तिनं माझ्या मनांतलं चटकन् ओळखलं आणि मला तिनं लागलंच हटकलन्—" काय ग कमल, तुला काय होत असतं ग ? आतांशा तुझा हा चेहरा असा कोमेज-लेला कां ? अन् तूं ही वाळलीस तरी किती ? "

म्यां बळेंच हंसू आणून ह्मटलं, "कांहीं नाहीं ग,—कांहीं—नाहीं. लोकांच्या नसत्या उठाठेवी शिवाय अन् त्यांचा विनाकारण अप-वाद ऐकावा लागणें याशिवाय दुसरं काय असायचं ? "

" खुळे पोरी, इतकं आपल्या प्रकृतीला नाजूक करून ठेवूं नकोस. मनांत जरा धीर ठेवावा. जगांत जितकं दुःख तितकंच सुखही पण भरलेलं आहे. मग उगीच दुर्मुखलेलं तें काय ह्मणून असायचं ? "

ह्या तिच्या बोलण्याचा माझ्या मनावर बराच परिणाम झाला आणि थोड्याच वेळांत, आमच्या इकडच्या तिकडच्या विषयांव गप्पा चालू झाल्या.

मीं ह्मटलें–" आपली पहिली बायको वारून पंधरावडादिखील लोटला नसेल, आणि डोळ्यांचं पाणी खळलं नसेल तोंच, नव्य बोहोल्यावर बसण्यासाठीं धावलेल्या माणसाचें काळीज पाहून–ह दोन्ही गोष्टींचा मेळ तरी कसा घालायचा, याचं मला अद्य कोडंच आहे ! आणि असं करण्यांत मोठं पुण्य लागतं ह्मणे देवा ! देवा ! आमचा धर्म इतका निर्दय–राक्षसी बनला व त्याला आपले असले रानटी प्रकार खुशाल खपतात ?"

माझ्या सोबतिणीनें मध्येंच हटकून ह्मटलं "छे ! छे ! कमल धार्मिक गोष्टीचं मर्म समजणें इतकं सोपं नाहीं. आंगांत चांगली विद्वत्ता असल्याखेरीज त्याचं खरं ज्ञान व्हायचं नाहीं. पण धर्म कशाला ? या आपल्या रोजच्या व्यवहारांतच काय कमी गो आहेत ? त्याच पाहिल्या तरी तुला अगदीं कसायासारखा वाट णारा हा प्रकार ठीकच आहे असें दिसेल."

हा सारा तिचा भडिमार पाहून मी अगदीं भांबावून गे माझ्या मैत्रीणीनें पुन्हां आपलें बोलणें सुरू केलें. "कमल, ज्याच आवडती बायको गेली त्याचं मन कुठलं ठिकाणावर रहायला तो आपल्या देहभानावर नसतो. पत्नीवियोगानं त्याचं अंतःकर आंतून करपून निघालेलं असतं. त्यावर उपशमाचा कांहीं उपच वेळींच न झाला तर त्याची शेवटीं जळून जळून राख व्हायची अशा माणसाची अन् आसन्नामरण झालेल्या दुर्धर रोगग्रस्ताच

स्थिती सारखीच. त्याची स्वतःची विचारशक्ती व कर्तृत्वशक्ती या दोन्ही बधिर झालेल्या असतात. यामुळें त्या रोगाचा उपचार करण्याचें काम आपल्या इष्टमित्रांना किंवा हितचिंतक अशा स्नेह्यांवर सोपवून, आपला प्राण वांचविण्याकरितां दिलेलं--अगदीं शिसारी आणणारें औषध--मनांत नसलं तरी, अळेंबळेंच घ्यायला हवं. "

तिनें दिलेला हा दाखला ऐकून मी चिप्प झालें आणि केवळ शून्य दृष्टीनें तिच्या तोंडाकडेच पाहत राहिलें.

तिनें आपलें बोलणें पुढें चालूच ठेवलें. ती ह्मणाली, "पहिल्यानें दुखण्याशीं खेळत बसायचं, आणि जेव्हां का दुखण्यानं रोग्याला पुरं ग्रासलं--आणि त्याच्या प्राणावर येऊन ठेपलं ह्मणजे मग त्याला मात्रा द्यायची यांत काय हंशील ? ग्याला तूं हवं तर आपलं 'काव्य' ह्मण. पण या खडतर अशा संसारांत 'काव्य' हें नेहमींच गोड लागणारं नसतं. मी देतें हा देखला जरा अभद्र वाटेल पण तो फार समर्पक असा असल्यानें मी देतें. हा वाद, मेल्यावर माणसाला जाळायचं कां पुरायचं याच्यासारखा आहे. हें पहा कमले, संसार मोठा विचित्र आहे. जसें मेल्यावर कुजणारें शरीर जाळणं हेंच उचित त्याचप्रमाणें माणसाच्या जिवंतपणीं वाढत्या दुःखालाही जाळणं हाच शहाणपणाचा मार्ग होय हें अनुभवानं पक्कं ठरून चुकलं आहे. पण याचें खरं खरं मर्म परक्या माणसांच्या ध्यानांत येणं कठीण !"

इच्या बोलण्यावर काय उत्तर द्यावें याविषयीं मी गोंधळांतच पडलें. माझ्या तोंडांतनं शब्दच फुटेना. क्षणभर थांबून मीं

मनाचा हिय्या करून ह्मटलं, "अश्रु ढाळीत ढाळीत, दगडासारखं मन घट्ट करून कसाबसा हा लगीनसोहाळा उरकून घ्यायला हवा खरा ! करणार काय ?"

रंगू ह्मणाली, "पाहिलंस. हेंच तें; तूं हें नेहमीं विसरतेस कीं आपल्या लोकांत लग्न हा एक संस्कार मानला गेला आहे. इथें विवाहाचा हेतू सात्विक प्रेमाचा असून पारलौकिक साधनाच्या पूर्ततेसाठीं त्याला बायकोची अपेक्षा असते. यांत स्वतःच्या आवडीनिवडीचा प्रश्न नाहीं. विलायतेंतल्यासारखं वधूवरांत आधींपासून चालत आलेल्या किंवा नव्यानं संपादन केलेल्या प्रेमाचं हें फळ नव्हे. इकडे लग्न वडील माणसं करून देतात. नवरानवरींच्या वेड्या प्रेमाचा यांत संबंध नसतो. जिथें स्वतःची आवडनिवड असते, जिथें स्वयंवराचा प्रकार चालू आहे, तिथें मात्र हें दुसरं लग्न करणं ह्मणजे माणुसकीला सोडून वागण्यासारखं, किंवा तुझ्याच ह्मणण्याप्रमाणें 'तिरडीवरच बोहलं मांडण्या' सारखं होय."

नंतर आमच्या इतर गप्पा सुरू झाल्या त्यांत ओघांत ग्रहणाच्या दिवशींचा तो मसणांत पोहोंचलेल्या त्या साठी उलटलेल्या थेरड्याचा कोवळ्या लुसलुशीत पोरीशीं झालेला विवाह—किंवा त्याला दिलेल्या नरबलीची गोष्ट माझ्या तोंडांतनं सहज बाहेर पडली.

तिनं ह्मटलं, "हे असले पैशाच्या लोभानं होणारे अनन्वित प्रकार एकाच देशांत किंवा समाजांत होतात, ते दुसरीकडे होत नाहींत असं का आहे ? जसं कित्येक आईबाप या द्रव्यलोभाला

वश होऊन आपल्यावरील जबाबदारीची विटंबना मांडतात तशीच विटंबना, जिथें नवरानवरी स्वतः आपल्या पसंतीनं लग्न ठरवितात तिथें नाहीं कां पहायला सांपडत ? द्रव्यलोभ इथेंही नसतो असं का तूं ह्मणतेस ? खरंच भारतीचें उदाहरण अत्यंत कष्टदायक असून तें पाहून मला किती तरी वाईट वाटलं. पण हीं उदाहरणं ह्मणजे खाष्टांपैकींच. त्यावरनं धर्माला दूषण फारसं देतां यायचं नाहीं. जगांत अशी कोणतीही चाल नसेल कीं जिचा दुरुपयोग माणसाला करतां येणार नाहीं."

मीं पुसलें—"पण रंगू, मी आपलं एरवींच विचारतें,—आमच्या धर्मानं, पुरुषांना एकाहून अधिक वाटेल तितक्या बायका करण्याची मोकळीक खरंच का ठेविली आहे ?"

तिनें उत्तर केलें—"हो असं दिसतं खरं. पण ही सवलत विशिष्ट प्रसंगीं व विशिष्ट कारणाकरितां ह्मणूनच ठेवलेली आहे. बायको वाईट चालीची असली, किंवा तिला मूलच होत नसलं, किंवा वेड लागलं, अशा कांहीं अपरिहार्य अडचणीच्या प्रसंगीं केवळ निरुपाय ह्मणून ही सवलत दिलेली आहे. पण आपण जें नेहमीं पाहतों त्यांत बहुधा असं दिसतं कीं केवळ पशूलाच साजणाऱ्या विषयवासनेला बळी पडून, या केवळ निरुपाय ह्मणून दिलेल्या सवलतीचा लोक दुरुपयोग करतात. त्याला बिचारा धर्म काय रडणार ? ह्या उदाहरणाची तरफदारी करणारे धर्मात्मे मोठ्या उदार अंतःकरणाचेच ह्मणायचं !"

नंतर कांहीं वेळपर्यंत आमच्या गोष्टी गौरीची तिच्या जिवंतपणींच झालेल्या क्रियेच्या संबंधांत झाल्या. यावरनं मला एक प्रश्न सुचला, व त्याचें उत्तर रंगूला देता यायचं नाहीं असं मला वाटलं.

म्यां ह्मटलं, "अहो रंगूताई, माणूस जिवंत असतांनाच त्याची क्रिया करायचा जो मार्ग त्यावर आपलं काय ह्मणणं ? कारण विधवेशीं लग्न लावल्याच्या पातकाबद्दल त्याची व धर्मांतर केलेल्या तशाच दुसऱ्या एका गृहस्थाची क्रिया जिवंतपणींच केल्याचं माझ्या ऐकण्यांत आहे."

रंगू ह्मणाली, " आमच्या शास्त्राप्रमाणें धर्मांतर केलेला माणूस मेल्यासारखा—ह्मणजे आपल्या जातीपुरता तरी तो मेल्याचसारखा समजतात. पण आमच्या शास्त्रांनीं याचा अक्षरशः अर्थ करून त्याला ही पुढची क्रियाही जोडून दिली आहे. हा एक धर्मबंडाचाच एक मासला. हें एक नुसतं धर्माचं सोंग ! "

मीं ह्मटलं " सोंग ? मी ह्मणतें ही शुद्ध दांडगाई. हा केवळ दुसऱ्याचा छळ ! "

" बरं कां होईना. पण हा मनांत नसतांना—अहेतुक—असा केलेला छळ ह्मण हवा तर ! "

लिहितां लिहितां माझं हें पत्र बरंच लांबलं. तेव्हां आमचा पुढील संवाद मी पुढच्या पत्रावर ठेवतें.

आपली,

कमला.





# पत्र १९ वें.



## जातिभेदाविषयीं रंगूचे विचार.

**प्रा**णेश्वरा, रंगूशीं झालेल्या संवादाची हकीगत जी मागच्या पत्रीं दिली तिच्यापासून आपल्याला काय वाटलें तें मला सांगतां येत नाहीं; पण मी मात्र ऐकून अगदीं चकित होऊन गेलें. मागच्या पत्राच्या शेवटीं शेवटीं माझ्या प्रश्नाला दिलेला तिचा तो जबाब— तो तिचा समयसूचक कोटिक्रम पाहून मला हंसूं आलें. खरंच तिच्या आंगचं तें शहाणपण पाहून मला तिची वाखाणणी करा-वीशी वाटते. विशेषसं लिहिणं वाचणं न येतां इतकी महत्वाची माहिती तुला ग कशी मिळवतां आली ह्मणून मी तिला प्रश्न केला. ती ह्मणाली, " तूं जी इतकी माझी वाखाणणी केलीस तिला मी मुळींच पात्र नाहीं. पण एवढी गोष्ट मात्र खरी कीं मला जर कांहीं थोडी फार माहिती झाली असली तर आमच्या अण्णां ( वृद्ध आजोबा )ची अन् इतर विद्वान शास्त्री मंडळीची जी चर्चा चाले ती मी लक्ष देऊन ऐकत असें. त्याचं हें फळ."

मीं ह्मटलं, " जुन्या, स्नानसंध्याशील, बाळबोध घराण्यांत जन्माला येणें हें केवढं भाग्य ! बाबा—त्यांच्या विद्वत्ते-विषयीं व योग्यतेविषयीं मला पूर्णपणें आदर आहे—हे विश्वकुटुंबी, अत्यंत उदार मताचे असून त्यांनीं मला सुधारक-पद्धतीनं वाढ-विलं. पण तिचा कीं नाहीं मला अलीकडेस वीट यायला

लागला आहे. तसं माझं आई आणि बाबा यांजवर अत्यंत प्रेम असून मला त्यांच्या त्या मायाळू व सौम्य स्वभावाबद्दल अत्यंत कृतज्ञता वाटते.

वाचून वाचून मी आपले डोळे मात्र खराब करून घेतले; पण अशा या वाचण्यापासून फायदा तो कोणता ? अन् त्यांतही अर्धवट शिकलेल्या सुधारकांनीं लिहिलेलीं पुस्तकें वाचून काय उपयोग ? माझ्या दृष्टीनं ह्या इंग्रजी शिकलेल्या मंडळीपैकीं बरेचसे लोक पाश्चात्य समाजाविषयींच्या अपरिपक्व कल्पनांच्या भरीं भरलेले, व आमच्या समाजस्थितीविषयीं चुटपुटत्या ज्ञानावर पोसलेले धड हिंदू ना धड मुसलमान असे असतात. सुधारणेविषयींचे त्यांचे ते ठराव आणि त्यांचा तो कार्यक्रम वास्तविक पाहतां मला पटायला हवा. पण तो मला देखील, पुष्कळ वेळां बाष्कळपणाचा वाटतो—"

रंगू मध्येंच अडवून म्हणाली:—"आमच्या चालीरीतींत आणि समाजनिर्बंधांत बराचसा असा भाग आहे कीं, त्यांत सुधारणेला बराचसा वाव असून, ती व्हायलाच हवी. त्याविषयीं कांहीं वाद नाहीं. प्रश्न एवढाच कीं, ती आमच्यांतले सुधारक म्हणतात तशी किंवा तितकी करणें इष्ट आहे कीं काय ? तसंच हेंही पण विसरतां कामा नये कीं, मूठभर लोकांना असं करणं कितीही अविचाराचं किंवा असह्य असं वाटलं तरी पुष्कळशा बाबतींत फेरबदल करतां येत नाहीं. कां कीं, असं केल्यानं आमच्या समाजरचनेची जी इमारत आहे तिचं स्वरूपच बदलून जाईल, व ज्याच्या पायाच्या आधारावर आज ती इतकीं शतकें टिकून

राहिली आहे त्या तिच्या पायालाच धक्का पोहोंचेल. असले हे संस्कार व सामाजिक प्रतिबंध हे कोणत्या ना कोणत्या रूपांत, प्रत्येक समाजांत घालून दिलेले असून ते तसे असायलाच हवेत. आणि नवीन परिस्थितीमुळें, ज्या व्यक्तींच्या आचारविचारांत फेरबदल झालेला असेल, त्यांना ते कितीही जाचक असले तरी एकंदरींत त्यांचा फार उपयोग होतो. अतिशय अवाढव्य, भव्य व मजबूत अशा इमारतीला प्रसंगपरत्वें गिलावा किंवा रंगरोगण करण्याची मधून मधून आवश्यकता असते; परंतु ती नव्या पायावर मात्र बसवितां येत नाहीं. तसंच त्याच्या मूळ घटनेंत किंवा रूपांत फेरफार करायचा तर मूळ इमारतीला जमीनदोस्त केल्याशिवाय तसें करतां येणें शक्य नाहीं. आणि मूठभर व्यक्तींना तसें कसं करतां येईल? ह्या लोकांना आपल्या जुन्या इमारतीचा नुसत्या रंगरोगणानं समाधान न होण्याइतका कंटाळा आला असला व तींत राहणें त्यांस बरें वाटत नसलें, तर त्यांनीं आपल्याकरितां नवी जागा शोधून काढावी—मग ती एकीकडची कां असेना—आणि तिथें साधल्यास आपल्या कल्पनेप्रमाणें हवेली झुकवून द्यावी. यदाकदाचित् त्यांचा हा प्रयत्न फसलाच आणि त्यांची ही इमारत थोडा वेळ टिकून जर खालीं बसली तर त्यापासनं पुढील पिढीला एक मोठा धडा—अमोल धडा—घ्यायला सांपडेल."

मीं ह्मटलं, "अगदीं खरी गोष्ट. आणि या इंग्रेजी शिकून वडवाघुळासारखी स्थिती झालेल्या लोकांची जातिभेदाच्या अनिष्ट परिणामाबद्दल जी सारखी टकळी सुरू असते, आणि त्या विषयाचं, जणूं काय, त्यांना वेडच लागलेलं आहे.—त्याला मागें सारणारें

असं दुसरं असेलसं मला वाटत नाहीं.—निदान माझ्या माहितींत तरी नाहीं."

रंगू ह्मणाली—" अगदीं वरवर पाहणारांना देखील ही गोष्ट दिसेल कीं जगांत कुठेंही जा, त्या ठिकाणीं जात ही आढळायचीच आणि फार मोठ्या समाजांत जाती असणं आवश्यकच आहे. त्यांत असं मात्र होईल कीं ज्याला आह्मी जात ह्मणतों त्याला दुसरीकडे लोक ' वर्ग ' किंवा ' दर्जा' ह्मणून ह्मणतील व दुसरीकडे त्यांत फेरबदल होणें शक्य असतें पण ती इथें कायमचीच. पण गुणकर्मविभागाच्या कल्पनेवर झालेली जातिसंस्थेची रचना अढळ असून ती हिंदूवर्णाश्रमव्यवस्थेचें मूलभूत अंग मानली जाते. त्यांत फेरबदल करायचा ह्मणजे मूळ इमारतीचाच नाश करायचा; एरवीं शक्य नाहीं. खरोखर जातिबंधन पार झुगारून दिल्याचा जे बाणा मिरवितात अशांच्या वर्तनावर देखील जात आपला भयंकर प्रभाव प्रत्यहीं गाजवितांना पाहून मोठी मौज वाटते. हिंदूधर्म सोडून ख्रिस्ती झालेल्या गृहस्थालाही रोटीबेटीव्यवहाराच्या किंवा अशाच दुसऱ्या बाबतींत जातिभेदाचें विस्मरण क्वचितच होतें. वरच्या जातींतला माणूस खालच्या जातीच्या माणसाशीं पूर्णपणें मिसळायला किंवा त्यांत अगदीं मिळून जायला खूष नसतो. याच्या उलट हलक्या जातींतला मनुष्य सारे एका पंक्तीला केव्हां बसतील, व मूळचे भेद दाखविणारीं लक्षणं केव्हां नष्ट होतील हें पाहायला अगदीं हपापलेला असतो. कपाळावरचं गंध किंवा कुंकू नांवाच्या अखेरचे जातिदर्शक मायने कांहीं थोडया मंडळींनीं किंवा साऱ्यांनीं हवे तर

टाकून द्यावेत; पण बाटलेल्या गृहस्थाच्या गोटांतलं दिखील हें जातिभेदाचं बंड मोडायला शेंकडों वर्षं गेलीं पाहिजेत. आणि खरं ह्मटलं तर अगदीं नसानसांतनं सारखं खेळणार हे जातिभेदाचें रक्त शरीराच्या निव्वळ एकदोन भागांतच आहे असं मानणेंही शुद्ध वेडेपणा आहे."

यावर कोटी करण्याच्या उद्देशानं मीं ह्मटलं, "या जातिवाचक संज्ञा काढून आपल्या नांवाला रोड बनविण्यापेक्षां, सर्वांना सारखीच लावतां येईल अशी एखादी उच्च जातीची नवी पदवीच घेतली तर यांत त्यांची किती तरी सोय होईल!"

रंगू हंसत हंसत ह्मणते, "वा ग कमळे, तूं तर कमालच केलीस बाई! खरंच, तुझी सूचना अमलांत आणल्यानं जातीजातींत घोटाळा माजून सारेच जण वरच्या दर्जाला पोहोंचतील. मी ह्मणतें आमच्या खिस्ती मंडळींनीं यावरनं धडा घ्यावा अन् आपल्या नांवामागें, राव, शास्त्री, पंत, प्रसाद, सिंग वगैरे लावायला सुरुवात करावी."

मीं ह्मटलं—"त्यापेक्षां, जातिभेदाविरुद्ध मोठा गिल्ला करणाऱ्या आमच्या या हिंदू मंडळींना हा इषारा जास्त सोयीचा दिसतो. कारण, जर एखाद्यानें आपल्या नांवापुढें एखादें उपपद—उदाहरणार्थ 'शास्त्री'—लावलें तर हा मूळचा ब्राह्मण होता कीं ब्राह्मणेतर होता हें सांगायला फार कठीण जाईल."

रंगूची हंसतां हंसतां मुरकुंडी वळली. इतक्यांत आपल्या घराच्या अगदीं बाहेरच्या फाटकापाशीं एक बाई गाणं गात होती तिच्याकडे आमचें लक्ष वेधलें. काय आहे ह्मणून पाहण्याकरितां आह्मी

तेथवर गेलों तों एक तरुण भिकारीण एका लहान मुलाला आपल्या लुगड्याच्या झोळींत घेऊन आलेली आह्मांला दिसली. आह्मांला पडलेल्या दगदगीचं सार्थक झालंसं वाटलं. कारण तसं नक्षत्रासारखं देखणं पोर धुंडायला गेलं तर सांपडणार नाहीं. बाईनं तें मूल उघडून दाखविलं. त्या चिमुकल्या अर्भकाच्या चेहऱ्यावर झळकणारें तें दैवी तेज पाहून मला त्या मुलाला आपल्याजवळ घ्यावें अन् मटामट मुके घ्यावे असा मोह झाला. त्याची ती बालमुद्रा, त्याचीं तीं काळीं कुरळीं झुलपें, त्याचे ते पाणीदार डोळे, ते गुलाबी रंगाचे ओठ, चिमुकले हात पाय,—एकंदर सौंदर्याची छबी शुद्ध बावनकशी सोनेंच—असं तें बालरत्न पाहून ज्या बाईनं तें आणलं तिचंच तें मूल असेलसें वाटेना. मीं त्या बाईच्या चेहऱ्याकडे चांगलं निरखून पाहिलं. आणि रंगूचेंही पण लक्ष तिच्याच कडे लक्ष होतें. ती कसली मेली हिडिस—काळी कुब्जा, शुद्ध धुतलेला विस्तव. तिच्यांत आणि देवा सारख्या त्या छोट्या मुलांत केवढं अंतर ? आणि अशी ती बाई त्या तीन महिन्याच्या मुलाची आई खास दिसत नव्हती.

शेवटीं मीं सुस्कारा टाकीत ह्मटलं, "कसलं खडतर जग हें ! आणि त्यांत आपल्याला आयुष्याचे दिवस काढायचे ?"

माझ्या मैत्रिणीनें यावर टीका करून ह्मटलें, "बाई ग, कुठेंही गेलं तरी पळसाला तीनच पानं. प्रत्येक समाजांत हें असंच असायचं."

भाग्यानं वांचलेल्या, त्या फिरत्या भिकारणीच्या पदरीं पडलेल्या गरीब बिचाऱ्या त्या अर्भकाकडे पाहून माझं मन अगदीं

कळवळून गेलं. रंगूला त्या गोजिरवाण्या मुलाकडे तसंच पाहात सोडून मी तडक घरांत गेलें व आंतून एक शालजोडीचें पटकुर व स्वतः माझ्याचसाठीं शिवलेलं पण सैल झालेलं पोलकं आणून त्या बाईला दिलं. ह्याच्यापासनं त्या मुलाला सुख लागेल ह्या विचारानं माझ्या मनाला मोठा आनंद झाला. रंगूनं तिला एक पावली आधींच दिली होती. आणखी एक पावली मी दिल्यावर ती भिकारीण निघून गेली.

मीं विचारलें, "रंगे, आपल्या या देशांत हे जे नेहमीं भीक मागण्याचा धंदा करणारे लोक आहेत त्यांच्याबद्दल तुझं मत काय आहे ? ज्यांना आपलं पोट भरतां येतं अशांनासुद्धां सरसकट भीक घालणं हें पुष्कळांच्या मतें अगदीं गैर आहे."

रंगूनें नेहमींप्रमाणें चटकन् उत्तर दिलें. "हें एक दुसरें खूळ आपल्या लोकांच्या डोक्यांत शिरलेलें आहे व तें त्यांच्या नेहमीं बोलण्यांत येत असतं. ते जसं कांहीं या एवढ्या मोठ्या आपल्या अफाट देशांत जो एवढा मोठा लक्षावधी लोकसमूह आहे त्या सर्वांना पुरून उरेसें काम देशांतल्या देशांतच आहे. इकडे भिक्षा बंद केली कीं तिकडे गुन्हे व आपत्तीचें मान बेसुमार वाढलंच.या लोकांना एक तर चोराचा किंवा धाडे घालायचा धंदा करायला पाहिजे किंवा अनिर्वचनीय अशा कंगालीच्या यातनांत खितपत मेलं पाहिजे हें दुसरें, याच्याशिवाय तिसरा मार्ग नाहीं. साहेब लोकांच्या देशांत तरी काय, एका बाजूला अठरा विश्वे दारिद्र्य तर त्याच्या शेजारलाच डोळे दिपून जाण्याइतकी अलोट संपत्ति व चैनबाजी अशीं उदाहरणें नजरेस

पडतात. देवाची ही मोठीच कृपा ह्मणायची कीं आमच्या इक-डची जरी इतकी कंगाल स्थिती असली तरी असल्या प्रकारच्या भयंकर विरोधाचीं उदाहरणें इथें पाहायला सांपडत नाहींत. एकंदर मानवजातीला काळोखी आणणाऱ्या या नीचावस्थेपासनं सुटायला कारण आपल्यांतली ही दानधर्माची पद्धतीच होय."

मीं तिला मध्येंच अडवून ह्मटलं, "पण हें पहा कनई दान-धर्माच्या या पद्धतीचा आमच्या घरांतल्या व्यवस्थेपर्यंत परिणाम पोहोंचला आहे त्याची वाट काय?"

"पण जरा धीर धरशील कीं नाहीं? मी तेंच सांगतें आहे पुढें."

प्राणेश्वरा, रंगूच्या त्या भाषणाचा परिणाम माझ्या मनावर एवढा झाला कीं हें पत्र कितीतरी लांबलं हें माझ्या लक्षांत आलं नाहीं, पण आतां इथेंच पुरें करितें.

आपली,

कमला.





# पत्र २० वें.



प्रियकरा, रंगूताईला केलेल्या प्रश्नाचें उत्तर, जणूं काय अगदीं ती प्रश्नाची वाटच पहात होती. तापलेल्या तव्यावर पाणी पडण्याचा अवकाश कीं जसा छरर असा आवाज निघतो, तसें अगदीं तातडीनें तिचें उत्तर मला मिळालं.

ती म्हणाली, माणसाला स्वार्थत्यागाचें वळण लावून दैवी स्वरूपाकडे नेणारी जी ही आमची धर्मादायपद्धति तिला आरंभ घरांतूनच झालेला असतो. हिंदूसमाजरचनेला भूषणभूत झालेली अशी जी समाईककुटुंबपद्धती तींत हिचा पहिला अंकुर प्रगट झाला असून, परस्परांत वागणाऱ्या प्रेमानं व ममतेनं घरांतील सारीं माणसं एकजीव होतात. प्रत्येकाला, कुटुंबासाठीं सोसावा लागणारा त्रास, इतरांच्या सुखांत भर पडावी म्हणून त्यासाठीं त्या अनुरोधानं ठेवावं लागणारं वर्तन, हीं समाईक कुटुंबांतच आढळतात. जिथें माणूस आपल्या बायकापोरांना घेऊन वेगळी चूल मांडूं पहातो आणि जिथें केवळ स्वार्थाचीच मातबरी असते,त्या विभक्त कुटुंबपद्धतींत ती कोठून दिसणार?

मीं म्हटलं, " गडे रंगू, आमची ही अविभक्तकुटुंबपद्धति आणि मिळवित्या माणसाच्या जीवावर पुष्ट होणारे खुशालचंद यांच्या विरुद्ध किती तरी कागाळ्या ऐकूं येतात. विद्येच्या बळावर मिळविलेल्या पैशावर एकट्या—कमावत्या—माणसाचाच हक्क

असावा अशी जी एक अप्पलपोटेपणाची सूचना आपल्यांतल्याच एका विद्वान् गृहस्थानें केल्याचं तुझ्या ऐकण्यांत आलं असेलच. ती सूचना अमलांत येते कीं काय, अशी पुष्कळांना भीति पडली होती. पण इतक्यांत सुदैवानं ती फेटाळली गेली म्हणा.

रंगू म्हणाली, " थोडक्यांत, आणि सौम्य शब्दांत म्हणायचं म्हणजे ही सूचना केवळ मूर्खपणाची व आपल्याच पायावर धोंडा पाडून घेण्यासारखी आहे. आपल्या भावांचा वारसा उडवूं पहा-णाऱ्या या आपमतलबी माणसाचीच गोष्ट घेऊं. समजा, त्याच्या स्वतःच्या मुलांपैकींच एखाद्याच्या शिक्षणाला बोळ बसला, व तो पुढें निराधार झाला; व त्याच्या संपन्न भावंडानें आपल्या त्या निराधार झालेल्या भावास मदत करण्याचें साफ नाकारलें, तर आपल्या या मुलाचें वर्तन पाहून बापाला आनंदाच्या उकळ्या फुटतील नाहीं ? कारण त्यांत त्याच्या तत्वाचा विजय झाला ना ? कां त्याचें वर्तन पाहून बापाच्या आंगावर कांटा उभा राहील ? खरोखर, कमले, ममत्व व प्रेम यांच्या बीजापासनं होणारा हा अविभक्त कुटुंबपद्धतीचा वृक्ष सारखा वाढत राहून, कुटुंबांत सर्व-दूर त्याचा फैलाव झालेला असतां त्याचा सर्वथैव नाश करणें इष्ट नाहीं. अर्थात् त्याच्या डहाळ्या एकमेकांनां अडवायला लागल्या कीं त्यांना हव्या तर छाटाव्यात—मी ह्मणतें छाटणेंच बरें ! पण प्रत्येक डहाळी पुन्हां वाढून तिचें निराळें झाड व्हायचेंच, व त्यास पुन्हां आंगच्या डहाळ्या फुटायच्याच.

मीं ह्मटलं, " गडे रंगू, आपल्या या सामायिकपणाच्या पायीं बिचाऱ्या बायकांची दैना उडाली आहे व घरांतल्या घरांत त्यांचा दर्जा उतरला आहे असें नाहीं कां तुला वाटत ?"

माझ्या चतुर मैत्रिणीनें उत्तर केलें, "हा का त्या पद्धतीचा दोष? तरण्या मुलींना कुटुंबांतल्या वडील ह्मातान्या माणसांची मर्यादा राखण्यासाठीं ह्मणून जी शिस्त घालून दिली आहे तिच्या अतिरेकाचें हें फळ आहे. हा काळाकुट्ट थर–ह्यानंच समाज-रचनेला अगदीं ओंगळ स्वरूप आलेलें आहे. एवढ्यासाठीं तो काढून टाकून त्याच्या जागीं नवा थर देऊन, त्यावर नवं रंग-रोगण करायला हवं."

## बायांना मिळणारें शिक्षण.

भीत भीत मीं ह्मटलं–"माझ्या मतानं बऱ्याच अंशानं, आमच्या स्त्रीवर्गाची स्थिती–अज्ञान स्थीती–हीच या गोष्टीला कारण आहे. मला वाटतं, त्यांना उत्कृष्ट तऱ्हेचं शिक्षण मिळायला हवं. पण त्यांत शाळांतून दिल्या जाणाऱ्या अर्धकच्च्या उपऱ्या शिक्षणा-सारखा प्रकार मात्र नसावा."

माझ्या सोबतिणीनें आपली मान हालवून ह्मटलं, "तूं ह्मणतेस तें रास्त आहे. पण एक लिहितांवाचतां आलं ह्मणजे आमच्ये (बायकांचे) हातीं चांदोबा आला अशी मात्र तूं आपली कल्पना करून घेऊं नकोस. आपल्या या देशांत ज्या लक्षावधी स्त्रिया आहेत, त्यांतून थोड्याच–अगदीं थोड्याच–स्त्रियांना अशा प्रका-रचं शिक्षण मिळणें शक्य आहे. कदाचित् दहा हजारांत एखादी स्त्री निघेल न निघेल–विशेषतः सध्यांच्या कालांत आपल्या देशाची स्थिती अत्यंत गरीबीची असून लोकांना खायला पुरं पोटभर अन्नही मिळत नाहीं तेव्हां तर विचारायलाच नको. मागें आपल्या भरभराटीच्या काळांतही अशा तऱ्हेचं शिक्षण मिळणाऱ्यांची

संख्या फार असेलसं समजूं नकोस. गरिबीमुळें, ज्यांना घरच्या घरींच, जीं कामं रोज करायचीं त्यांचं शिक्षण द्यायची तर तरतूद करणें एवढेंच काय तें शक्य. अशांचीच संख्या प्रायः फार. देवाच्या दयेनं, घरच्या अनुकूल परिस्थितीमुळें चांगले उच्च संस्कार ज्यांना संपादन करतां येतील व ज्या निरनिराळ्या प्रकाशमान तारकांप्रमाणें आपल्या समाजाला उजेडांत आणतील, अशांची केव्हांही परिमितच असायची. तरी पण ती वाढविण्याची पराकाष्ठा केली पाहिजे, हें जसं बायांविषयीं तसंच पुरुषांविषयींही पण ह्मणतां येईल. आणि पृथ्वीच्या पाठीवर विद्यमान असणाऱ्या कोणत्याही समाज रचनेला ही गोष्ट लागू पडणारी आहे. ही विश्वांतली श्रेष्ठ कोटी होय."

मीं पुसलें—"गडे, ज्या समाजाच्या आडकाठीमुळें स्त्रीपुरुषांचं दळणवळण मोकळेपणें होणें दुरापास्त झालेलं आहे, तीविषयीं तुझें काय मत आहे बरं ? आमच्या राज्यकर्त्यांच्या देशांत होतं त्याचप्रमाणें इकडेही स्त्रीपुरुष परस्परांत खुशाल मिसळूं लागले तर त्यापासनं एकंदर समाजसुखाचें मान वाढून समाजाचेंही पाऊल एकंदरींत पुढें पडणार नाहीं काय ?"

माझ्या मैत्रिणीनें उत्तर केलें—"हा एक आमच्या समाज-रचनेच्या मूळाशीं असलेला असा भाग आहे कीं ज्यांत फेरबदल करतां येणें शक्य नाहीं. तरी पण त्यावर जें घाणेरडें—ओंगळ—असें वरून पूट बसलेलें आहे व त्याचाच जो हा एवढा विस्तार झालेला दिसतो, तें काढून टाकणें इष्ट, नव्हे आवश्यक, दिसतें. हें पहा कमल, स्त्रीस अत्युत्कृष्ट व बहुमोल भूषण समजून, प्रत्येक

समाजव्यवस्थेंत, तिच्या शुद्धतेवर अत्यंत कटाक्ष ठेवलेला आहे; आणि ती राखण्यासाठीं या दोघांत कितपत मोकळीक किंवा दळणवळण राहूं देणें रास्त आहे याविषयीं त्यांनीं नियम घालून दिलेले आहेत. ज्याप्रमाणें आपल्या आणि साहेब लोकांच्या रिवाजांत अंतर आहे, त्याचप्रमाणें निरनिराळ्या समाजानें घालून दिलेल्या निर्बंधांतही अतिशय अंतर आहे; पण एकंदरींत पाहतां अमका एक निर्बंध इतरांहून जास्त चांगला किंवा वाईट हें ठरवितां येणें अशक्य आहे. गोऱ्या लोकांनीं आमचे निर्बंध आपल्या समाजांत सुरू करणें जितक्या अविचाराचें होईल तितकेंच त्यांचे निर्बंध आमच्या समाजावर लादणें तितक्याच अशक्य कोटींतलें व खुळेपणाचें होईल. हवं तर कांहीं माणसांनीं याचा व्यक्तिशः प्रयत्न करून पहावा. आणि जी भीती साधारणतः समाजाला सकारण वाटत असते, तींतून हे बचावले तर त्यांनीं आपल्या प्रारब्धाची रेषा सबळ समजावी."

कांहींसं आश्चर्य वाटून मीं ह्मटलं, "तर मग तुझ्या मनांत गोषा रहायलाच हवा. कसला मेला कैदखाना तो! मेल्यानं बायांना घरांतल्या घरांत कोंडून ठेवून निव्वळ पशूंच्या पायरीला नेऊन पोहोंचविलं आहे. आणि देवानं दिलेली हवा अन् उजेड हीं देखील त्यांच्या पासनं हिरावून घेतलीं आहेत."

माझ्या मैत्रिणीनं कानउघाडणी करण्याच्या उद्देशानं ह्मटलें, "छे! छे! कमले, काय हें वेड्यासारखं तूं बरळतेस? या आपल्या हिंदू समाजांत कुठें दिसतो गोषा? नाहीं ह्मणायला कोठें एखाद्या कोनाकोपऱ्यांत ज्या ठिकाणीं द्रव्यमदानं आपला स्वैराचार माजविला असेल तेथें किंवा इंग्रजी शिकून तयार झालेल्या नव्या मंडळीनें, त्यांचा दर्जा वाढल्यामुळें, कांहींसा हा प्रकार उचलला खरा! खेड्यापाड्यांत जा आणि तिथें स्त्रियांना—मग ती तरुण

असो वा वृद्ध असो–किती मोकळीक ठेविली आहे ती पहा. त्या पुरुषांत खुलेपणें वावरतांना व आपलीं कामंकाजं करीत असतांना आढळतील. शहरांत देखील साधारण स्थितीच्या कुटुंबांतील बायांच्या स्थितीकडे पहा. या तुमच्या अधिकाराच्या, पैशाच्या, किंवा मानापमानाच्या कल्पनेमुळें भलतेच निर्बंध समाजांत शिरले असून त्यांनीं आमच्या पद्धतीच्या मूलभूत तत्वावर निष्कारण शिंतोडे उडविले आहेत आणि त्यावर ही एवढी टीका होत आहे.''

आतां पांचाचा सुमार असल्यानें रंगूताई घरीं जायला उठली. इतका वेळपर्यंत निरनिराळ्या विषयांवर आमच्या सारख्या गप्पा झाल्या तरी तिला जाऊं द्यावेंसें वाटेना. लौकरच चारी धामयात्रा मी करणार आहें ह्मणून ती ह्मणाली. त निघायच्या पूर्वी पुन्हां एकवार भेटण्याचें कबूल करून ती घरीं जायला निघाली. तिचंदेखील पाऊल तिथून निघेना.

परमप्रिय प्राणेश्वरा, या लांबलचक माझ्या एरंडाच्या गुन्हाळानं आपल्याला कंटाळा आला असेल नाहीं ? खरं ह्मटलं तर याचा स्वारीला कंटाळा येऊं नये. कारण रंगूचं मागचं भाषण तिकडे भारी आवडलं ह्मणून लिहायचं झालं होतं. या लिहिण्यापासनं माझा स्वतःचाही फायदा झाला. माझ्या पूर्वींच्या उदासवाण्या विचारांचा मला विसर पडला, आणि आतां, प्राणेश्वरा, मला इकडच्या प्रेमाखेरीज कांहींच दिसत नाहीं. प्राणेश्वरा, केवळ आपल्या प्रेमाची, आणि त्या आपल्या प्रेमळ अंतःकरणाची खूण ह्मणून आपल्या हातच्या एखाद्या ओळीची मी भुकेली आहें. आपल्याला अगदींच सवड व्हायची नाहीं इतकं कां काम आहे ? कीं—स्वारीला—पण—जाऊं द्या—मी आपल्या तोंडांतून तें कशाला काढूं ?

आपली,

कमला.



# पत्र २१ वें.

## परवांचं लग्न.

पुन्हां आजही निराशाच ! आणि उद्यांला पत्राच्याऐवजीं स्वतः स्वारीच्याच येण्याची मी वाट पाहतें आहे. कारण परवां-पासनं बक्षींच्या इथलं लगिन सुरू व्हायचं आहे ना ?

हें पत्र पोहोंचायच्या आधींच निघायचं होईल. तरी पण ह्मटलं धाडून पहावं; साधलं तर साधलं. अन् तशांत कोणीं पाहिलं आहे—मध्येंच कांहीं तरी निघायचं आणि त्यामुळें इकडे यायचा बेत फिसकटायचा. मी मनांतल्या मनांत मांडे खातें आहें. पण शेवटीं पाणी व्हायचं. नाहीं तर आजकाल माझे दिवस फिरले आहेत, तेव्हां कांहीं विपरीत घडलं तर त्याचं मला मुळींच नवल वाटायचं नाहीं.

सध्यां जी दोघांची ताटातूट झाली आहे, तीमुळें इकडचं दर्शन होण्याच्या आधीं ज्यांनीं मजबद्दल मागणी केली होती त्यांना वाटेल त्या कंड्या पिकवून द्यायला चांगलीच फूस सांप-डली. जगांत रिकामटेकडे लोक कमी कां आहेत ? परस्परांत भांडणं लावून देणं हाच त्यांचा रोजचा धंदा व तेंच त्यांना पुण्यकार्य वाटत असतं. धन्य आहे अशा प्राण्यांची अन् काय ? दोघांत भांडण !—प्राणेश्वरा,—हें कधीं तरी होणें शक्य आहे काय ?

आपली,

**कमला.**



# पत्र २२ वें.



## स्तुतीचा वर्षाव !

**शे**वटीं स्वतःचें पत्रच हातीं पडलें ! निराशा खरी, पण त्यांतच मनाला समाधान वाटलं. ग्रहांनीं शेवटीं आपला प्रभाव दाखविलाच ! त्यांत कशी चूक होईल ? चांगल्याचा का पडताळा यायचा ? तर मग मला ज्या ज्या गोष्टींची भीति वाटते त्या साऱ्याच खऱ्या होणार कीं काय ? या संबंधानें नुसता विचार मनांत आला तरी देखील काळीज कसं थरं होतें. ऱ्यानं मला अखेरीस वेड तर नाहीं लागणार !

तर मग एकूण लग्नाला येतां नाहीं यायचें—अगदीं एका दिसासाठीं देखील नाहीं ना सवड व्हायची—इतकं काय मागें लागलेलं ? किती तरी ही दुःखाची गोष्ट ह्मणायची ! त्या ह्मातार्याचं स्वतः-वर केवढं प्रेम ?—अगदीं पोटच्या मुलासारखं वागवायचं ! त्याला कसें वाटेल ? मला तर खास वाटतं कीं, त्याला अगदीं चुकल्या चुकल्या सारखं होईल. तसंच त्या आपल्या " गंगाबाई " त्याही लग्नाला यायच्या आहेत. नक्कीच ठरलें तें ! सांगायचं झालं कीं तिच्या त्या टवाळीकडे आपण कसं तें लक्षच देऊं नये मुळीं ! खरें ! ह्मटलं तें मला कबूल !! स्वतःला ती अगदीं भाबडी अन् थापडवाईक अशी दिसते. पण तिच्या पोटांतले एकेक गूण कुठें स्वारीच्या नजरेला आले आहेत ? ती बोल बोलून मला सळो कां पळो करून सोडील ! ती सामान्य मूर्ती का आहे ? माझ्या

मनानं कीनई स्वारी शिवाय एकटं असं लग्नाला मुळींच जायचं नाहीं. आतां इकडचाच आग्रह पडला तर गोष्ट वेगळी. कारण इकडच्या मर्जीबाहेर काडी इतकं जायचं नाहीं हा तर माझा कृतनिश्चय. प्रियकरा, इतके दिवस जें मौनव्रत धरायचं त्याचा बराचसा वचपा, आपल्या प्रेमळ पत्रानं व त्यांत खच्चून भरलेल्या त्या ममतेच्या शब्दांनीं, काढला ह्मणायचा ! ह्मणायचं कीं माझीं पत्रं तिकडे भारी–भारी आवडतात. अन् तीं अगदीं संभाळून ठेवायचीं व पुनः पुनः वाचून स्वतःचें मन रिझवायचं ! ‘ ग्रहणाच्या दिवशींचें वर्णन जें तूं आपल्या पत्रांत दिलं आहेस तें खरोखर काव्यानं ओथंबलेलं असून अशा प्रकारची कवयित्री सहचरी मला मिळाली याबद्दलचा मला भारी अभिमान वाटतो !’ ‘ आमच्या नामदार मंडळींना जो तूं टोला दिलास तो अगदीं अनुरूप असून तो मला मानवला. ’ ‘पोकळडोक्यांच्या लग्नाची जी हकीगत लिहिलीस ती तर भारीच गमतीची. मला हसतां हसतां पुरेवाट झाली ! मी तिथं आल्यावर Mark Twain चं किंवा Moliere चं पुस्तकं तुला वाचून दाखविणार आहे ! रंगूच्या बरोबर जो तुझा संवाद झाला त्याची हकीगत जी तूं मला लिहिलीस ती वाचून माझ्या विचारांना एक नवंच वळण लागलं.’ ‘ आणि या सर्वांपेक्षां त्या जहागिरदारांच्या मुलींचं— माझ्या “ अप्सराद्वयांचं ” जें तूं अभिनंदन केलंस, त्या तुझा हा निर्मत्सर स्वभाव पाहून मला अत्यंत संतोष झाला व तुझ्या त्या औदार्यामुळें माझं तुजविषयींचं प्रेम वृद्धींगत झालं. ’–जीवितेश्वरा–अगदीं मोजक्या–गोड गोड शब्दांनींच आपण मला केवढं पण चढवून दिलंत ? आणि त्यापासनं माझ्या मनाला सुख आणि शांती यांची केवढी पण जोड करून दिलीत !

फिरून, असं ह्मणायचं कीं, 'अगदीं वरच्या डहाळीला लागलेल्या, मनाला मोहून घेणाऱ्या पिकलेल्या आंब्याप्रमाणें तुझी स्थिती असून तिथवर पोहोंचायला प्रेमाची शिडी लावावी लागली तेव्हां कुठें हात पोंचला.' 'आपणां उभयतांतला हा वियोग मी स्वतःला भाग्याच्या शिखरावर आहे असें समजत होतों अशाच वेळीं कींग तो घडून आला !' 'तुझ्यासाठीं माझा जीव किती पण तुटतो आहे ह्मणून सांगू ?—तुह्मा बायकांना—दुसऱ्याच्या अंतःकरणाची परीक्षाच व्हायची नाहीं.' प्राणेश्वरा ! यावर मी काय बोलूं ? या माझ्या अंतःकरणांत आपणास सांठविल्याशिवाय मी जिवंत तरी कशी राहणार ? तिकडच्या सहवासाची केवढी जबरदस्त लागलेली आहे !—तिकडल्या प्रेमाचे घुटके घेण्यार जीव किती तान्हेला—किती धाधावलेला आहे ? कोरडया तें मला कसं व्यक्त करतां येईल ? आपल्यास तरी होईल का त्या कल्पना ? मला नाहीं वाटत होईलशी ? ती व्हायला माझ्यासारख्या वेड लागलेल्या माणसाशींच गांठ पडली पाहिजे. इतरांना त्याचं केवळ 'हंसें' मात्र येणार आहे. प्राणेश्वरा, ही माझी भूक तहान आपण केव्हां भागविणार ? आणि या दैन्यावस्थेंतून माझा उद्धार कधीं करणार ?

जीवितेश्वरा, समोरच्या बागेंतून मी कांहीं बकुळीचीं फुलें वेंचून आणलेलीं आहेत, आणि त्यांचा एक छानदार हार म्यां तयार केला आहे. माझ्यासाठीं तो स्वतः गळ्यांत घालायचा अन् पाहायचं त्यानं तरी स्वतःला होणारं दुःख कांहीं कमी होतं कां !

येतें अं, प्राणेश्वरा, येतें—लग्नाहून परत येईपर्यंत—आपलं अंतःकरण मात्र माझं एकटीचंच असूं द्यायचं.

आपली,

**कमला.**



# पत्र २३ वें.



## ' मधेंमधें करणारी पुरुषी·बायको.'

' अती तिथें माती ' म्हणून म्हणच आहे. चांगल्या गोष्टीचा देखील अतिरेक झाला कीं त्यानें ओकारीच यायची. बक्षींच्या इथल्या लग्नांत तर मला याचा चांगलाच अनुभव आला. तो इतका कीं शेवटीं दगदगीनें मी अगदी रडकुंडीला आलें. असा हा प्रकार सारखा पांची दिवस चाललेला ! जेव्हां घरीं परत आलें आणि निवांत अशी कांहीं वेळ पडून राहिलें, तेव्हां कुठें जीवाला अमळसं बरं वाटलं. लग्नांत उडालेल्या गमतीच्या गोष्टी ऐकण्यासाठीं तिकडे अगदीं उत्सुकता झाली असेल हें मी समजून आहें. पण त्या साऱ्या हकीगतीचं लांबच लांब पत्र लिहिण्याजोगी कांहीं माझ्या मनाची स्थिती सध्यां नाहीं. म्हणून तें काम कांहीं दिवस लांबणीवर टाकून हलके हलकेच करायला हवं.

खरं म्हटलं तर लग्नाला जी मी गेलें ती मोठ्या कष्टानेंच—अळें बळेंच गेलें. तिथें जायचा मनापासनं कांहीं माझा विचार नव्हता. पण तिथें जाऊन पोहोंचल्यावर मात्र मी स्वतःचें भान अगदीं विसरलें—इतकी मी लग्नांत गढून गेलें. आपल्याकडनं जितकं होईल तितकी, दुसऱ्याच्या आनंदांत भर घालण्याची मी खटपट केली. पण स्वारी इथें नसतांना तशी भर मला एकटीला कितीशी घालतां येणार ? हो ! सांगायचं राहिलंच. आपल्या त्या गंगाबाईनं—गंगा-

जलाप्रमाणें निर्मल अशा त्या ' सज्जन ' गंगाबाईंनीं एक मोठ्या मानाची पदवी दिली आहे मला ! आलं का ध्यानांत कोणची ती ? कसें येणार ? त्याला गंगाबाई सारखंच निर्मळ मन हवं. एरवीं इतरांला कसचं साधतं तें ? "मधेंमधें तोंड घालणारी—लुडबुडी—पुरुषी बायको" ही पदवी आहे ती. तिची ती तिरसट मुद्रा काय, ती छद्मी नजर काय ? म्यां आपलं फारसं लक्षच दिलं नाहीं तिकडे !

' लुडबुडी पुरुषी बायको !' प्राणेश्वरा, कदाचित् एका अर्थानें—कांहीं नेमक्या पुरुषमंडळींत, बायकांप्रमाणेंच मी जी मिसळतें—त्या अर्थानें—पाहिलें तर तिचें तें म्हणणें अगदीं बरोबर आहे. लहानाची मोठी जी मी झालें ती अशाच स्थितींत झालें, एरवीं इकडचे पाय लाभलेच नसते. लग्नाला जमलेल्या इतर बायकांप्रमाणें मला संभावितपणाचा आव घालतां आला नाहीं, याबद्दलची खंतही पण मला वाटत नाहीं. पण कोणाच्याही कार्यांत मध्येंच लुडबुड केल्याचं माझं मला कांहीं आठवत नाहीं. निदान बक्षींच्या इथें तरी नाहीं हें खास ! नवऱ्या मुलीच्या वेणीफणीचें काम करावें असा आग्रह साऱ्या बायांनीं मला केला म्हणून तें काम मी आपल्याकडे घेतलें. कांहीं बायांनीं तिला बाहुलीसारखं नटविण्याचं चालविलं होतं त्याला मोडता घालायचं कारण तरी पोरीकडे माझा ओढा म्हणून. मुलीच्या बरोबर मी जी राहात होतें व तिची आईसारखी काळजी घेत होतें, याचं कारण स्वतःला त्या मुलीवरचा असलेला लळा हेंच होय ! आल्या गेल्या बायांना हळदकुंकू मिळालें कीं नाहीं; त्यांना नारळ व खोबऱ्याच्या वाट्या दिल्या गेल्या कीं नाहींत; जेवून गेलेल्या बायांना विडे मिळाले कीं नाहीं; या साऱ्या गोष्टींची नसती 'उठाठेव' जी मीं केली, तिचें कारण

मुलीच्या बापानेंच ती कामगिरी माझ्यावर सोंपविली होती म्हणून. तशांत इकडचा त्यांच्याशीं केवढा घरोबा ? भावाहून जास्त प्रेम. तेव्हां इकडच्या करतां म्हणून तरी मला आपला सारा परकेपणा एकीकडे ठेवून घरच्या सारखं—ओंचा खोंचून कामाला लागायलाच हवं. अन् त्यांत मुलीची आई बिचारी आजारी आणि अशक्त ! तेव्हां मला स्वस्थ बसून—तिऱ्हाइतासारखें मौज पहात कसं बसवतें. अन् जोंपर्यंत असें वागायला इकडची पूर्ण संमती आहे—स्वतःला माझं वर्तन लुडबुडेपणाचं वाटत नाहीं—तोंपर्यंत इतर कोणीही, कितीही मला नांवं ठेवलीं म्हणून मी त्याची कशाला पर्वा करूं ? पण माणूस जेव्हां अगदीं खऱ्या खऱ्या मनानं —केवळ प्रेमाखातर म्हणून—खस्ता सोसायला तयार होतं आणि खरी गोम अशी असतांना या अभिष्ट बायकांकडनं त्या माणसाला "लुडबुडी" म्हणून किताब मिळतो, तेव्हां प्राणेश्वरा, आपल्या या निष्कपटपणाचें असें भलतेंच बक्षीस मिळालेलं पाहून माणसाला थोडें तरी वाईट नाहीं कां वाटायचं ?

या माझ्या धुसपुसण्यानें तिकडे इतकं कांहीं घाबरायला नको बरं कां ? या कागदावर म्यां आपल्या मनांत होतं नव्हतं तेवढं सारं ओकून टाकलं आणि सुटला गंगाबाईचा संबंध हें कांहीं सांगायला नकोच. लग्नघरीं, वाटेल त्याशीं जुळवून घेणारी, मनमिळाऊ, म्हणून म्हटली जात होतें. आणि माझा मूळचाच स्वभाव तसा असल्याची स्वतःला नव्यानें का माहिती करून द्यायला हवी ?

आपली,

**कमला.**

---



# पत्र २४ वें.



## प्रेमाची जादू.

प्रियकरा,—लग्नाच्या संबंधांत, माझ्या मनांत इतकं काहीं लिहायचं आहे कीं, त्याला कुठून सुरुवात करावी अन् कशी करावी हेंच कळत नाहीं. लिहायच्या गोष्टी रगड आहेत; पण त्याचमुळें माझें मन अधिक गोंधळून गेलेलं आहे. गेल्या पांच-सात दिवसांत जो लग्नाचा धुमाकूळ बक्षींच्या इथें सारखा चाल-लेला होता त्याची आठवण झाली कीं मन गोंधळूंच लागतें.

कोणत्याही गोष्टीचं काय अतिरेक झाला ह्मणजे तिथें तिला मुळांतली चव रहात नाहीं. चांगल्या गोष्टी असल्या ह्मणून त्या मर्यादेबाहेर गेल्या कीं त्यांचा चांगुलपणा नाहींसा होऊं लागतो. अन् वाटतें कीं नको हें ! जगांतल्या प्रत्येक वस्तूंत हेंच व्यंग आहे. उजेडानं आपल्याला पदार्थ पहातां येतो हें खरें, पण तोच जर का प्रमाणाबाहेर गेला तर दृष्टी दिपते आणि माणसाला दिसे-नासें होतें. पैशानें हवी ती जिन्नस पैदा करतां येते, आणि माण-साला स्वतःची उन्नतीही करून घेतां येते; पण तोच पैसा माण-साला शुद्ध सैतान बनवून अधोगतीला न्यायालाही कारण होतो. झिम झिम पडणाऱ्या पावसानं शेतं झपाट्यानं वाढीस लागतात पण तोच का मुसळधार पाऊस पडायला लागला कीं गांवचीं गांवं वाहून जातात—मग त्यांत लहान लहान घरांची काय कथा ?

नाहीं ह्मणायला जिचा कधींही अतिरेक होत नाहीं. किंवा जिचा माणसाला वीट येत नाहीं अशी एकच वस्तु जगांत मला दिसते. ती वस्तू कोणती ? 'प्रेमा'-खेरीज दुसरी कोणती असणार ? प्रेमाचा प्रवाह कितीही दांडगा झाला ह्मणून त्यानं कोणाचा नाश केला आहे असं व्हायचंच नाहीं. तसं झालं ह्मणजे अमृताच्या सागरांत पडून माणसास मरणच येतें ह्मणायचें ! " प्रेम ' हें असें आहे कीं तें मृत्युलोकींचें असतांही त्यांत हीन-पणाचा अंश नसून दिव्यत्व भरलेलें आहे.

प्राणेश्वरा, आतां अगदीं तृप्ती झाली—असे उद्गार बाहेर पाडणारें एकमेकाला दाखवितां येईल काय ? छे ! मला तर असं होणं शक्य वाटत नाहीं. प्रेम ह्मणजे आत्म्याचा विकास.—त्याच्यांत जों जों भर टाकावी तों तों तें विस्तार पावतें.—देण्यानें त्या प्रेमप्रवाहाचें पोषण होतें.—वाहण्यानें त्या प्रवाहाला भरती येते. खरें प्रेम दैवी आहे ! त्याला आदीही नाहीं किंवा अंतही नाहीं ! आपणा दोघांतला प्रेमाचा अंकुर केव्हां उद्भवला हें आपल्याला येईल कां सांगतां ? मला तर कांहीं आठवत नाहीं, तरी पण आपणा उभयतांच्या अंतःकरणांत प्रेमानं आपलं पुरतं ठाणं दिलं तो काळ, मला वाटतं, दोघांच्याही स्मरणांत आहे. प्रेमाचा आरंभ कधीं होतो या गोष्टीचें, आयुष्यांतील इतर सर्व गोष्टींसारखें गूढच आहे. विधात्याचा हा एक जादूचा खेळच ह्मणायचा ! मूळांत कांहींही नसतांना त्याचा हा केवढा विस्तार त्या गारुड्यानें केला ? संसारांत माणसावर जे बरेवाईट प्रसंग येत, असतात त्या साऱ्यांना शेवट आहे. पण जीवनाचें सार—जें प्रेम—तें मात्र अविनाशी आहे.

जिवलगा, खरंच, स्वतःला आहे का आठवण आपल्या लग्नाच्या वेळची ? आणि त्यांतली एखादी गोष्ट येईल का सांगतां ? मला तरी नाहीं सांगतां यायची. पण इतकं मात्र खरं कीं, प्रेमानं माझ्या आयुष्यांतला एवढा मोठा काळ जो गिळून टाकला त्याचं मला मुळींच दुःख होत नाहीं. बर्क्षींच्या इथलं लग्न पाहून माझ्या मनांत एक भलतीच इच्छा उत्पन्न झाली. असं वाटलं कीं जरी एक वेळ आपलं लग्न लागलं असलं तरी हा पवित्र संस्कार पुन्हां एकदां घडवून आणावा. अर्थात् ही मूर्ख-पणाची व अगदीं पोरकट कल्पना. 'तसं होणं' हें अशक्यच आहे.

पण ते संस्कार पाहिले तर—अहाहा ! किती गंभीर, किती पवित्र, मनोवेधक, आणि त्यांत किती पण अर्थ भरलेला आहे ? त्यांचा मोहकपणा या छोटीच्या लग्नांत जितका माझ्या मनाला पटला, तितका पूर्वीं कधींही पटला नव्हता !

आपली,

**कमला.**





# पत्र २९ वें.

## बक्षींच्या घरचें लग्न.

बुधवारीं सकाळीं आठांच्या सुमारास आह्मी बक्षीजींच्या घरीं जाऊन पोहोंचलों ! तो गाजावाजा, ती माणसांची गर्दी, अन् एकंदरींत चाललेला तो गोंधळ पाहून आपला मोती पुन्हां बिथरतो कीं काय अशी मनाला मोठी धास्ती होती. पण तसें कांहीं झालें नाहीं. स्वारीनें शांतपणानें सुखें आह्मांला त्या कमानी दरवाजांत नेऊन सोडलें. त्या वेळीं मला किती तरी बरं वाटलं ! पुढच्या पडवींतच बरीचशी मंडळी मला बसलेली दिसली. त्यांत कांहीं पोक्त वयाची पण बरीचशी अगदीं तरुणांतली अशी असावी. आमची गाडी थांबतां क्षणींच वाटेंतली मंडळी एकीकडे सरली व त्यांनीं आह्मांला आंत जायला रस्ता करून दिला. मी इकडे तिकडे न पाहतां सडक घरांतली वाट धरली. घरचे मालक इकडचेच नांवकरी, मला दाराशींच सामोरे आले, हंसत हंसतच त्यांनीं माझें स्वागत केलें. माझ्या पाठोपाठ ते आंत आले व एक दिवस आधीं येऊन घरांत पहायला व मदत करायला हवी होती ती केली नाहीं ह्मणून त्यांनीं मला चांगलाच टोला दिला. नंतर माझ्याकडे कोणकोणतीं कामं सोपविलेलीं आहेत—अन् तीं अगदीं वरच्यासारखीं करायचीं ह्मणून मला बजावून माझ्याबरोबर चालून तीं तीं कामं त्यांनीं मला दाखविलीं. मग कांहीं

वेळ थोड्याशा अंतरावर सरासरी दहाएक मिनिटं आह्मी हळूहळू बोलत होतों. पहिल्या पाहिल्यानं तर त्यांचं स्वतःचं कुटुंब—घरची मालकीणही—होतीच.

हें पाहून दुसऱ्या अंगाला बायकांचा घोळकाच्या घोळका जमलेला होता त्यांत कुजबुज सुरू झाली. त्यांत गंगाबाई मुखरण असून त्या माझ्याकडे बोट दाखवून जमलेल्या बायांना सारख्या हंसवीत असल्याचें मला दिसलं. 'मी ह्मणतें, या परक्या बाईला—ती पैसेवाली किंवा शिकली सवरलेली असली ह्मणून काय झालं—ती का त्यांची सख्खी बहीण लागते कां पुतणीचें त्यांचें नातें—कांहीं अगदीं जवळचं नातं असलं तर बाई गोष्ट निराळी, पण तें कांहींही नसतांना असल्या मोठ्या माणसाशीं बरोबर अगदीं खांद्यांशीं खांदा लावून जवळ एकटेपणीं उभे राहणं शोभतं कां ? तिच्या नवऱ्याचा किंवा वडिलांचा त्यांच्याशीं अगदीं घरोबा असला ह्मणून काय झालं ? एवढ्यावरनं तिनं दुसऱ्याच्या घरांत कच्चा कारभार करायचा—अन् तोही इतक्या राजरोसपणें तो काय ह्मणून ? असंच जर आहे तर मग ती त्यांच्या बरोबर लगीनच कां नाहीं करीत ?—त्यांच्या त्या बायकोला तरी हें कसं पाहवतं, ह्याचेंच मला बाई मोठं नवल वाटतं ! पण गरीब बिचारी ती. ती तरी काय करणार ? सदान् कदा रोगानं पिडलेली ती, अन् भारी अशक्त ! अन् ताठा पहा केवढा तो ! बाकी सर्व बायक चांगलीं भारी लुगडीं नेसलेलीं असतांना ही बघा कशी नुसतं साधं पातळ अन् तेंही अगदीं बारीक किनारीचें नेस आली ! आंगावर तरी किती थोडं घातलेलं कीं, जसं कां

आपलं रूप हेंच आपल्याला पुरेसं असून या दागिन्यांनीं त्याची छबी मात्र मारली जाणार ! आह्मांला ती, दागिन्यांनीं लादलेलीं गाढवं ह्मणत नाहीं, हेंच आमचें मोठं भाग्य !' कसली घाणेरडी टीका ही ! काय ह्मणे " ती दिसायला किती साधीभोळी स्वभावानं पण मिठ्ठी ! हं: लोकांना तिचा मिस्किलपणा कुठें दिसतो आहे ! त्याच्या जोरावर तर ती लोकांचं मन मोहून घेते–अन् लोकंही बरीं भाळतात तिला ! हो ! लोकांनीं चांगली ह्मटल्यावर सहजच तुमच्या तोंडाला खीळ नाहीं का बसायची ? "

असल्या प्रकारच्या त्या वायफळ–चहाटळपणाच्या कुजबुजी ऐकून ऐकून तर माझे कान किटून गेले. पण अशा या मोठ्या कार्यांच्या प्रसंगीं त्या योगानें माझ्या मनाची तशी फारशी चलबिचल होणं शक्य नव्हतं.

जवळचीच बाग नवऱ्या मुलाकडील मंडळीस जानवशाला दिली होती. मुलीचे आईबाप, बरोबर, कांहीं आप्त मंडळी, इष्टमित्र, व भिक्षुकांना घेऊन तिकडेच वाङ्निश्चय उरकून घेण्याकरितां गेले होते. रीतीप्रमाणें सारा विधी आटोपला. नवऱ्या मुलाला व व्याह्यांना पोषाख वगैरे व्हायचे ते झाले. दोन्हीकडच्या कुलांचे गोत्रोच्चार व्हायचे ते सारे झाले. मुलाकडच्यांनींही संमतीदाखल परत मुलीला साडीचोळी, सरीवांकी, व तिच्या आईबापांना पोषाख दिल्यावर मंडळी परतली. ह्याही वेळेला गोत्रोच्चाराचा विधी फिरून झालाच. ठरलेली मुहूर्त घटका कळवायला व शिरस्त्याचं बोलावणं करायला ह्मणून कांहीं थोडीशी मंडळी बागेंत गेली व इकडे लोक व्याही मंडळीच्या येण्याची व आल्यावर त्यांच्या स्वागताची तयारी करण्यांत गुंतली.

त्या वेळीं चांगले नऊ वाजून गेले होते. आकाश अगदीं निरभ्र असून लखख सूर्यप्रकाश पडला होता. छोटीच्या लग्नाला एकंदर मुहूर्त तर चांगला लागला ! अकरा व बाराच्या दरम्यान मुहूर्त घटका धरल्यानं, अन् बरंचसं आन्हिक अद्याप उरकायचं असल्यामुळें, मुलाकडे घाई करायला बोलावण्यावर बोलावणीं जात होतीं.

शेवटीं एकदाची ती मंडळी बाहेर पडली. व नवरदेवाची स्वारी एका टुमदार चौचाकी सजविलेल्या उमद्या अरबी घोड्याच्या बगींत बसून पावणे दहाच्या सुमाराला येऊन पोहोंचली. त्या वेळीं तासे न् वाजंत्रीं, सनया अशा अनेक वाद्यांचा, अगदीं कानठाळ्या बसतील असा, सारखा घोष चालला होता. नवऱ्या मुलाच्या डाव्या अंगाला दोन मुलं न् समोर चार मुलं बसविलेलीं होतीं. सारेजण आपआपल्या पोषाखांतच मग्न होते. या लग्नाच्या निमित्तानं मिरवणुकींत आपला होणारा बेडजाव पाहून त्यांचे चेहरे प्रफुल्लित झालेले दिसत होते. नवऱ्या मुलाला व्यायला व्याही सामोरे आले व ते त्यांना दिवाणखान्यांत घेऊन गेले. पण जायच्या आधीं दोघा सुवासनींनीं करे धरलेले होते ते त्याच्यावरनं ओवाळून टाकले. ते एवढ्याकरतां कीं कोणाची दृष्टबिष्ट त्याला लागूं नये- दिवाणखान्यांत कोण गर्दी झालेली ! ज्यांची पहिल्यापासनं ओळख होती ते व नव्यानंच पहाणारे, असे दोघेही मुलाला पहायला उतावीळ झालेले होते. मुलाचा सुरेख व गोजिरवाणा असा चेहरा बघून साऱ्यांच्या वृत्ती आनंदानं उचंबळून गेल्या. विशेषतः ह्याताऱ्या

बायकांच्या तर आनंदाला पारावारच उरला नव्हता. छोटीला शोभेलसा रूपानें साखसुरेख असा हा नवरा मुलगा—सध्यां चणींत लहान असला तरी लौकरच उंचींत भरेल. दिसायलाही चांगला देखणा. देव करील तर खास आपलं नांव काढील व थोड्याच दिवसांत तो आपल्या बापाच्या योग्यतेला पोहोंचेल. शिवाय वडिलाजवळ पैसाही रग्गड—तेव्हां कोणाच्या तोंडाकडे पाहायला नको. खायची ददात नाहीं. ह्यांना होणारीं पोरं बाळं—कारण लग्नामागनं हेंही आलंच—अशींच सुरेख व्हायचीं हेंही पण ठरलेलंच. कांहीं कांहीं म्हाताऱ्या बायकांच्या डोळ्यासमोर तर तीं एव्हांच दिसायला लागलीं, व त्यांना घ्यायाकरितां व कवटाळून छातीला लावयासाठीं आपले हात देखील एव्हांच पसरले होते असें म्हटलें तरी चालेल.

झालेल्या आनंदाचें हें भरतें थोड्याच वेळांत ओसरून पुन्हां जिकडेतिकडे स्थिरस्थावर झालं. आरंभीचं गणपतीपूजन, मुलाच्या अंगाला तेल लावणं, वगैरे झाल्यावर त्याला अभ्यंगस्नानाकरितां न्हाणीघरांत नेलं.

स्नान झाल्यावर नवऱ्यामुलाला बोहोल्यावर आणून बसविलं. तिथें सुरेख रंगीबेरंगी रांगोळ्या काढलेल्या असून मांडवाभोवतीं ठिकठिकाणीं आंब्याच्या पल्लवांनीं सर्व जागा सुशोभित केलेली होती. मुलीचे आईबाप व त्यांचे उपाध्येबुवा हे समोर बसल्यावर आधीं त्यांनीं शास्त्रोक्त विधीनं निरनिराळ्या देवतांचं पूजन केलं. जवळच, नातेवाईक, इष्टमित्र, व विद्वान् भिक्षुक मंडळी बसलेली होती. त्यांच्या [illegible]

छोटीच्या आईबापांनीं जावयाच्या पायावर दूध ओतलं व चांदीच्या ताम्हनांत त्याचे पाय धुतले. नंतर पीतांबर, शालजोडी, अंगठी, कंठा, चांदीचा तांब्या, फुलपात्र वगैरे वर-देवाला अर्पण केल्या. सरतेशेवटीं सर्वांत मोठी देणगी—ह्मणजे इतक्या दिवस मोठ्या ममतेनें वाढवलेली, केवळ काळजाचा घड अशी ती एकुलती एक मुलगी आंतून बाहेर आणविली. तिला नवऱ्यामुलासमोर बसवून लागलीच अंतर्पाट धरला. मुलीला आईबापांजवळ बसविलं असून गोत्रोच्चार, कुलोच्चार, नामोच्चार वगैरे विधी फिरून करण्यांत आले. नंतर त्यांनीं आपल्या लाडक्या मुलीचे हात अंतर्पाटाखालनं मुलाच्या हातांत दिले. इकडे तोंडानं ब्राह्मण मंत्र ह्मणतच होते. त्या मंत्रानं पवित्र झालेलं पाणी जावयाच्या हातावर ओतून कन्यादान करण्यांत आलं. धर्म, अर्थ, काम, मोक्ष—या ऐहिक व पारमार्थिक कल्याणा-करितां त्यांनीं आपल्या पोटच्या गोळ्याला—छोटीला—परक्याच्या स्वाधीन केली. अंतर्पाट सारून उभयतां वधूवरांना आमोरासमोर—एका वितीच्या अंतरावर—उभं केलं. पण छोटीनं जी एकदां आपली मान लाजेनं खालीं घातली ती घातलीच. त्यानंतर वधूवरांनीं एकमेकांवर हळदवलेल्या अक्षता टाकण्याचा मोठा गमतीचा प्रकार झाला.

कन्यादान विधी आटोपल्यावर मुलीचे आईबाप आपल्या जागेवरनं उठले. झालं; आजपासनं छोटी त्याची सहधर्मचारिणी—इहलोकीं व परलोकीं—झाली. सहधर्मिणी ह्मणायचं कारण तिच्या द्वारानं इहलोकचं व परलोकचं सुख त्याला मिळायचं. यानंतर

ब्राह्मणांचीं आशिर्वचनें चालू असून चारी बाजूनं त्या तरुण दंपत्यावर अक्षतांचा वर्षाव होत होता.

हें सारं आटोपतं न आटोपतं तोंच घडयाळांत बाराचा ठोका पडला. सनईच्या बाहेर चाललेल्या गोड सुराबरोबरच इकडे आंत आळीपाळीनं बायकांत मंगलगीतं ह्मणायचं काम चालू होतं. त्यापैकीं एक कडवें मी इथें देतें; तें वाचून त्याची तारीफ करायची बरं का ?

नको उसासे सोडुं, सख्यांनो ! दुःखाचे, वाया ।
नर-जाती ही सदैव खोटी–नलगे सांगाया ॥
पाऊल सागरिं एक तयांचें, एक भूमिवरती ।
भारिच चंचल मन, न टिके तें कधिं एकावरती ॥

* * *

खरोखर, गाण्यांतल्या त्या माधुर्यानं, गेल्या बुधवाराला, जितकं माझं मन द्रवलं असेल तसं पूर्वी कधींही झालं नाही. माझ्या आंगावर रोमांच उभे राहिले व डोळ्यांतनं आनंदाश्रु वाहूं लागले. माझ्याचसारखी विहिणीच्या–नवऱ्या मुलाच्या आईच्या–मनाची स्थिती झाली होती. आपल्या आवडत्या मुलाचं तें वैभव, त्याचा तो होणारा भाग्योदय,पाहून तिचा आनंद पोटांत माईना.मुलीच्या आईचीही दशा अशीच झाली. तिचं अंतःकरण एकवेळ सुखानं फुलून सुपाएवढं होई, तर क्षणांत पुन्हां बिचारी खिन्न होई व तिला कांही सुचेना ! मनाची खिन्नता वाढण्याचं कारण आतां लौकरच थोडयाच वेळांत आपली ही एकुलती एक लाडकी पोर आपल्याला सोडून जाणार–स्वतःपासनं दूर होणार–हे विचार

मनांत येत. हर्ष वाटण्याचं कारण, आपल्या मुलीला-पोटच्या हाडामासाच्या या गोळ्याला-आई झालेल्याचं पहायला मिळेल, ह्याचं चित्र तिच्या डोळ्यासमोर उभं राहिलं,हें. अशी एकही बाई नसेल कीं जिला आज आनंद झाला नसेल व आनंदाचें प्रतिबिंब जिच्या डोळ्यांत चमकत नसेल.

जेवढं माझ्या दृष्टीस पडलं त्यावरनं पुरुषांचं कांहीं मला सांगतां येत नाहीं. पण माझी कल्पना अशी आहे कीं त्या दिवशींचा तो गंभीर व हृदयद्रावक प्रकार पाहून त्यांचं अंतःकरण देखील गहिंवरलं असावें. पण कार्य हें तर आटपलंच पाहिजे. एवढ्याकरितां इष्टमित्रांचें व नातेवाइकांकडून आलेल्या आहेराला सुरुवात झाली. ते झाल्यावर जमलेल्या विद्वान् ब्राह्मण मंडळींनीं नूतन विवाहित दांपत्यावर, खड्या सुरावर तोंडानं मंत्र ह्मणत हातांनीं मंत्राक्षतांचा वर्षाव केला.

नंतर दोघी सवाष्णी तबकांत आर्तीचं सामान घेऊन आल्या व मुलांमुलीसमोर उभ्या राहून कायसंसं तोंडांतल्या तोंडांतच पुटपुटल्या. तें कांहीं ऐकूं आलें नाहीं. तें झाल्यावर उभयतां वधूवरांवरून दिवा ओवाळणं झाल्यावर गालांतल्या गालांत हंसत हंसत त्या घरांत पळाल्या. कारण एवढ्या मोठ्या पुरुष समाजासमोर उभं राहून मंगलगीत ह्मणायचं ह्मणजे जरा लाजेचंच काम ! नंतर भिक्षुकांना दक्षिणा व गृहस्थांना पानसुपारी झाल्यावर जमलेली मंडळी आपापल्या घरीं निघून गेली.

आपली,

कमला.



# पत्र २६ वें.

## लगिन-सोहाळे. सप्तपदी.

प्रियकरा,—पहिल्या दिवशीं, दुपारला झालेल्या सोहोळ्यांची बहुतेक सारी हकीगत मी आपल्या कालच्या पत्रांत दिलीच आहे. टाळी वाजली कीं लग्न झालंच, आणि व्हायचे ते धार्मिक विधीही आटोपलेच; आतां काय, नुसत्या जेवणाच्या पंक्ती किंवा बायकांचे कांहीं लगिनसोहाळे—हौशीच्या—पायघड्यांच्या मिरवणुकीसारख्या—गोष्टी—व असेच कांही किरकोळ प्रकार व्हायचे राहिले असतील असं मला वाटलं. पण उपाध्येबुवांनीं, अद्याप एक महत्वाचा संस्कार व्हायचा राहिला आहे व तो झाल्यावांचून लग्न झालें असं ह्मणतां यायचें नाहीं, ह्मणून मला सांगितलं.

रोज कांहीं ना कांहीं तरी असायचंच. प्रथम प्रथम मला यांतल्या पुष्कळशा गोष्टी वायफळ असतील असं वाटलं, पण पांची दिवसांचे झालेले समारंभ पाहिल्यानंतर माझा पहिला ग्रह बदलला. एकंदरींत आपली पद्धत मला सुरेख वाटली. शेवटच्या दिवशींचा तो सुनमुख साडे व झालीचा प्रकार तर फारच महत्वाचा—व अत्यंत हृदयभेदक असा होता. पहिल्या दिवशीं टाळी वाजल्यावर, पुष्कळांना वाईट वाटलं. पण झालीच्या वेळेला ज्याच्या डोळ्याला पाणीं आलं नाहीं अशीं घट्ट अंतः-करणाचीं माणसं फारच थोडीं दिसलीं. माझा तर ऊर भरून

आला व मला, त्या दिवशीं आपण शाकुंतलांतला चौथा अंक वाचीत असतांना कण्वाचं ' अर्थो हि कन्या परकीय एव—असें ह्मणून—परक्याचं धन कन्या' ह्मणून ह्मटलं त्याची आठवण झाली. त्या झालीच्या वेळेला मला कवीच्या ह्मणण्याचा खरा खरा अर्थ पटला, व वाटायला लागलं कीं माझी जर अशी स्थिती तर बिचाऱ्या मुलीच्या आईच्या मनाची काय अवस्था झाली असेल ? ती समजायला व सांगायला कालीदासासारखा महाकवीच हवा. मी लिहून लिहून किती लिहिणार ? अन् त्याच्या सारख्याला देखील ' नकळे कैसे गृहस्थ सोशिति कन्याविराहाला' असं कण्वांच्या तोंडून सांगावं लागलं.

पण हें काय ? मी कुठची कुठें वाहावलें ? उगाच—या निमित्तानं त्या वेळची आठवण झाली ह्मणून व तो वेग आवरवेना ह्मणून मी कांहीं तरी भरकटलं इतकंच.

बुधवारीं जेवणें खाणें—फराळ—आटोपण्यांतच दुपारचे तीन वाजून गेले. कारण आपल्यांतली कांहीं कांहीं मंडळी तरी—निदान कर्मठ व इंग्रजीचा फारसा संस्कार न झालेली मंडळी तरी—स्नानंसध्या आटोपायच्या पूर्वी—चहा काफी किंवा बिस्किटांना मुळींच हात लावायची नाहींत. जेवायला, पाहुणी मंडळी, व नात्या गोत्याची मंडळी तर होतीच; पण याखेरीज ब्राह्मण भिक्षुक मंडळी—व आगांतुक वगैरे सारी मंडळी मिळून जवळ जवळ एक हजार पात्र असेल खरें. ब्राह्मणाच्या इथें लग्न असल्यावर आगंतुकांना कसं 'नाहीं' ह्मणतां येतं ? असं चांगलं सुग्रास—चमचमीत दोन तीन पक्वान्नांचं जेवण झाल्यावर प्रत्येकाला

सुस्ती चढली. त्यांतनं कांहीं कांहीं मंडळींनीं तर हलकेच काढता पाय घेतला व कांहीं जण जिथें जागा मिळाली तिथेंच वामकुक्षी करण्यासाठीं ह्मणून लवंडले.

बाहेरच्या माणसांचं निजणं ठीक होतं. पण घरच्या मंडळीच्या जीवाला कुठली उसंत ? त्यांतून—मुख्य—कर्त्या सवर्त्या माणसांच्या जीवाची कोण लावतोड; त्यांना कुठली विश्रांती मिळायला ! चारांच्या सुमारास, मंडपांत गाणं सुरू झालं, व हलकें हलकें एक एक मंडळी यायला सुरुवात झाली. त्यांच्यात सर्व प्रकारचा व जातीचा भरणा होता. सरकारी अधिकारी, वकील, शेट सावकार, इतर शिष्ट मंडळी—अशीं निरनिराळ्या तऱ्हेचीं माणसं होतीं. बाहेर बँड सुरूच होता. बक्षींचे वडील बंधू—घरचे मालकच ह्मणाना—येईल त्याचा सत्कार करण्यांत व सर्वांना पानसुपारी व हारतुरे मिळाले कीं नाहीं, याची चौकशी करण्यांत अगदीं गर्क होऊन गेले होते. नायकिणीला मात्र रजा दिली होती. कारण तिकडे ठाऊकच आहे. स्वतः सार-खंच तिकडचे स्नेहीही नाचाच्या चळवळीच्या विरुद्ध—ह्मणजे नाचणाऱ्या नायकिणीच्या विरुद्ध—आहेत. त्या ऐवजीं एका गवय्याची व बीनकाराची योजना झाली होती. बीनांत पुष्कळांना कांहीं नीटसं समजत नव्हतं. अन् गाण्यांत तरी समजत होतं कीं नाहीं हें नाहीं मला सांगतां येत; पण बरीचशी मंडळी जी माना डोलवीत होती—त्यावरनं मी ह्मणतें, कीं त्यांना तें फारच आव-डल्या सारखं वाटलं. पण मी सज्जावरनं जात असतांना जो प्रकार पाहिला त्याचें तें विलक्षण हात वारे—त्या कपाळाला चढ-

लेल्या आठ्या, कानावर हात ठेवून ताने सरशीं होणारें वेडंवाकडं तोंड, हीं पाहून तर त्या गाण्याचा मला वीट आला; अन् सकाळीं मी जी, इकडच्या नांवकऱ्यांना, बायकांकरितां गाण्याची सोय केली नाहीं ह्मणून पुष्कळसं बोललें त्याबद्दल माझंच मन मला खाऊं लागलं. तरी त्यांनीं दुसऱ्या दिवशीं फोनोग्राफ किंवा तशीच कांहीं तरी दुसरी कर्मणुकीची सोय लावण्याचं कबूल केलं होतं त्यामुळें तर मला भारीच ओशाळल्या सारखं झालं.

आमच्या इकडे बाया मंडळींतही व्यवस्था कांहीं वाईटापैकीं नव्हती. पुरुषां इतक्या बायका जमल्या नव्हत्या हें खास. पण मोठ्या घरच्या बऱ्याचशा बाया आपलीं लहान मुलं घेऊन या समारंभाला आल्या होत्या. अन् त्यामुळें एक प्रकारची शोभा आली होती. कांहीं ह्मटलं तरी बायकांवाचून अशा कोणत्याही समारंभाला शोभा यायची नाहीं. अन्–श्री–जी पहिल्यांदा साऱ्यांना काढावी लागते–व लहान मोठे सारे–जिच्या भजनीं लाग-तात–ती स्त्रीच आहे. बायकांत–कांहीं बिनाबोलावल्याही–नारळ–खोबऱ्याच्या वाट्यांच्या आशेनं आलेल्या होत्या. हें मी टोंचून लिहितें असं नव्हे हो. कारण हा दोष त्यांचा का आहे.? गरीबीचा विशेष अनुभव मला नसला तरी पण त्यांची स्थितीच त्यांना भाग पाडते असं मला वाटतं. पुरुषांत अन् बायकांत फरक हा. या क्षुल्लक गोष्टीकडे पुरुषांचं फारसं लक्ष गेलं नसतं ह्मणा. असो. आमच्याकडे रागदारीचं नसलं तरी जमलेल्या बायांतूनच कांहीं जणींनीं आपल्या गाण्यानं ती उणीव भरून काढली. आतां आह्मा बायांत तोंड वेडींवांकडी करण्याचा व फेपरं आल्यासारखे आळेपिळे देण्याचा पुरुषांच्या आवडीचा प्रकार नव्हता हें खरं.

पण कांहीं कांहीं जणींचा आवाज फारच मंजुळ असून त्यांच्या गाण्यांनीं बायकांचें मन अगदीं रमून गेलं !

सूर्य मावळल्यावर तऱ्हतऱ्हेचे दिवे लागून सुंदर रोषनाई केलेली होती. त्याच्या त्या उजेडानं 'बक्षीबाग' कसा खुलून उठला होता. त्यांत त्या झाडांची चित्रविचित्र पडलेली छाया व दिव्यांचें मधल्या तळ्यांतल्या पाण्यांत पडलेलं प्रतिबिंब हें तर फारच सुरेख दिसत होतं.

साताला बोहल्यावर होमाचा अग्नि पेटवला गेला. व तिथें नवरानवरी—अगदीं जवळजवळ बसले होते. शिवाय उपाध्येबुवा, थोडी भिक्षुक मंडळी, व कांहीं आप्त मंडळी हीं तिथें असून, बाकी इतर मंडळी दुसरीकडे उद्योगांत होती. मंत्र ह्मणून अग्नि नारायणाला तूप भाताच्या आहुती दिल्या जात होत्या.

तें आटोपल्यावर वधूवरांना खुल्या पटांगणांत मांडवाच्या बाहेर नेऊन सप्तऋषींचें दर्शन करविलं. उपाध्येबुवांनीं, छोटीला लुकलुकणाऱ्या त्या अरुंधतीच्या—वसिष्ठाच्या बायकोच्या ताऱ्याकडे विशेषतः पाहायला सांगितलं. हें आटोपल्यावर हें विवाहित जोडपं फिरून आपल्या जागेवर येऊन बसलं, अन् तिथें सर्वांत शेवटचा—व अत्यंत महत्वाचा असा विधी—सप्तपदी—सर्वसाक्षी व पृथ्वीचें जीवन अशा त्या अग्निसमक्ष—आटोपण्यांत आली. याप्रमाणें उभयतां वधूवरांना कधींही तोडतां न येणारं असं हें धार्मिक विवाहबंधन पार पडलं. आजपासनं छोटी ही परगोत्रांत गेली. दुसऱ्याची झाली !

आपली,

**कमला.**



# पत्र २७ वें.



## मिरवणूक.

खरं ह्मटलं तर दुसरा दिवस फुरसतींतच गेला. नाहीं ह्मणायला, जेवणीं खाणीं, ब्राह्मणभोजनं, अन् गाणं बजावणं, बायकांची गर्दी, वगैरे प्रकार होते. पण हें तर साऱ्या लगीन भरच चालायचें.

तिसरा दिवस अगदीं तडामारींत गेला—निदान पुरुषांना तरी लांबलांबची विद्वान् मंडळी—नामांकित वेदांती, गायनाचार्य, पंडित शास्त्री, दशग्रंथी वगैरे—बरीच जमलेली होती. व या दूरदूरच्या मंडळी खेरीज जवळचीही विद्वान मंडळी बोलावलेली होती. या मंडळीच्या येण्यानं लग्नाला मोठी शोभा आलेली होती. या मंडळींचा घोळका जमला व त्या वेदशास्त्रसंपन्न मंडळींनीं खणखणींत आवाजांनीं गंभीर असे ते आशीर्वाद मंत्र ह्मणायला जेव्हां का सुरुवात केली तेव्हां त्यानं मंडप दणाणून सोडला. या ब्राह्मणांच्या बिदागीचं अन् देण्याघेण्याचं काम—मोठं चिकट आणि त्रासदायक काम—आजच आटपायचं होतं. विद्वान मंडळींना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें—बिदागी द्यायची—संभावना करायची—कोणाला महावस्त्र, कोणाला साधं, कोणाला नुसती दक्षिणा हें काम भारीच जिकिरीचं. अन् मंडळीही चांगलीच जमलेली

होती. हें सारं आटपून रात्रीच्या मिरवणुकीची तयारी पुन्हां करायची.

रात्रीं, शहरांतल्या मुख्य मुख्य पेठांतनं, वधुवरांची जंगी मिरवणूक काढली होती. बँड, तासे, वाजंत्री, वगैरे वाद्यें लावलीं होतीं. अन् वरातीच्या समोर नळे, चंद्रज्योती, झाडं, वगैरे तऱ्हतऱ्हेचं दारुकाम सोडून मोठा थाट केला होता.

चौथ्या दिवशीं विशेषशी भानगड नव्हती. संध्याकाळच्या सुमाराला बायकांची पंगत आटोपली. रात्रीला गृहस्थ मंडळीपैकीं खाशांची पंगत जेवायला—छे ! फराळाला—होती. या दोन्ही प्रसंगीं मोठ्या गमतीचे प्रकार घडले. पण त्याची हकीगत सांगायचं काम मी सध्यां लांबणीवर टाकतें.

पांचव्या—म्हणजे लग्नाच्या शेवटच्या दिवशीं बरीच धांदल होती. नवसाचें सत्यनारायण, अन् खराखुरा—" गोंधळ " उरकून घ्यायचा होता. कारण पहाट व्हायच्या पूर्वीच झालीचा मूहूर्त धरला असून सकाळी देव प्रतिष्ठा उठली—अन् सूप वाजलें कीं पावण्यारावळ्यापैकीं बरीच मंडळी आपआपल्या गांवीं रवाना व्हायची होती. म्हणून त्यांच्या जाण्याच्या पूर्वीच ह्या गोष्टी उरकून घ्यायला हव्या होत्या. एवढ्यासाठीं ही घाई ! तसंच लग्नाकरितां म्हणून दूरदूरहून गोळा झालेल्या मंडळींना ज्याच्या त्याच्या मना मानाप्रमाणं कोणाला शेले पागोटीं, बायकांना लुगडीं, कोणाला खण देऊन बोळवणीची तयारी करायची होती.

प्रियकरा मुलीला—आपल्या पोटच्या गोळ्याला—ज्याला न्हाणं माखणं करून, रात्रीचा दिवस करून लहानाचं मोठं केलं-

तिला सासरच्या अगदीं अनोळखी माणसांच्या स्वाधीन करायचा तो दुर्धर पण अनिवार्य प्रसंग आठवून छाती भरून येते. तो प्रसंग पहायला मी तेथेंच होतें. त्या वेळीं मनाची काय स्थिती झाली तें कांहीं मला शब्दांनीं सांगतां नाहीं यायचें. त्या प्रसंगाच्या नुसत्या विचारानंच माझे डोळे भरून आलेले आहेत–त्याची खूण या आजच्या पत्रांत ठिकठिकाणीं डाग पडून लिहिलेला मजकूर पुसट झाला आहे–त्यावरनं पटेल. पण मीं हें सांगायच्या आधींच तिकडे लक्षांत आलं असेल !

आपली,

कमला.





# पत्र २८ वें.



## झालं.

प्रियकरा,—सुनमुख, साडे, मांडवपरतणं वगैरे बायकांचे सोहाळे, व त्यांत नवऱ्या मुलाच्या आईला—करवल्यांना—वरपक्षाकडच्या बहुतेक साऱ्याच बायांना म्हणाना—अति महत्वाचा वाटणारा भाग म्हणजे-पायघड्यांची मिरवणूक, जेवणावळीच्या वेळचे ते उखाणे व त्या निमित्तानें एकमेकांनीं एकमेकांचें राजरोसपणें उट्टें काढून घेण्याची रीत वगैरे वगैरे किती तरी गोष्टी तिकडे कळविण्याजोग्या आहेत. पण त्यांच्यावर मी आजच झोड न उडवतां लग्नाची ही लांबण आजच्या पत्रांत आटोपती घेण्याचा मी विचार केला आहे. कारण आम्हां बायकांना या गोष्टींचं जितकं कौतुक वाटतं, व त्या इतक्या महत्वाच्या वाटतात तसं पुरुषांना थोडंच वाटणार आहे ! पुरुषांना या असल्या रिकाम्या उठाठेवी अन् रुसण्याफुगण्यापलीकडे, इतर महत्वाचीं कामें पुष्कळ असतात. तेव्हां तिकडे कंटाळायच्या आधींच आपलं म्हणतें आटोपतं घ्यावं कसं ?

तशी बहुतेक हकीगत मी तिकडे कळविली आहेच ह्मणा. आणि माझं रडणंही पण आटोपलंच. छोटीच्या लग्नांत शेवटीं शेवटीं जें हृदयद्रावक गाणं एका बाईनं ह्मटलेलं होतं तेंच काल

सारा दिवसभर माझ्या कानांत सारखं गुणगुणत होतं. त्या वेळचा तो सारा देखावा व ती झालेली मनाची व्याकुल स्थिति ही माझ्या डोळ्यांपुढें उभी राहिली व माझ्या डोळ्यांतनं सारखा अश्रुप्रवाह सुरू झाला. अशा त्या दुःखमिश्रित सुखाचें वर्णन कसं करतां यायचें ? छेः, अगदीं काळजाचं पाणी करणारा–मर्माला बोंचणारा असाच तो प्रसंग खरा !

मातापितरांना जीव कीं प्राण अशा त्या आपल्या मुलीला अगदीं परक्या गृहस्थाच्या हातांत देण्याची–नवऱ्या मुलाच्या घरच्या मंडळीच्या स्वाधीन करण्याची–वेळ येऊन ठेपली. तो प्रसंग फारच कठीण–खऱ्या खऱ्या परीक्षेची वेळ. पण ज्या कोणाला मुली आहेत त्याला ह्मणून या प्रसंगाला तोंड द्यायलाच हवं. आपल्या नांवकऱ्यांचा चेहरा या येऊन दत्त झालेल्या प्रसंगाच्या विचारानं अगदीं उतरून गेला होता. बायको त्यांच्या शेजारींच बसलेली–तिचा काय केवळ अस्थिपंजर उरलेला आहे–छोटी दोघांच्या मध्यें बसली होती. मुलांचे आईबाप व इतर नातेवाईक यांना एकामागून एक बोलवून त्यांचा वस्त्र व अत्तरपान करून सत्कार करायचा, आणि त्याच्या मागनं कुटुंबांत येणाऱ्या नव्या मुलीची काळजी नीटपणें घेण्याचं काम त्यांच्यावर सोंपवायचा क्रम सुरू झाला. उपाध्ये-जोवांचा मान त्यांच्या योग्यतेप्रमाणें सर्वांच्या आधीं असल्यानें, प्रथम त्यांचा सत्कार करण्यांत आला. गंध वगैरे लावून त्यांना शेलापागोटं, चांगली मौल्यवान शाल वगैरे दिल्यावर आई-बापांनीं–दोघांनीं मिळून–आपल्या त्या पोटच्या गोळ्याला

मांडीवर बसविलें. त्या वेळेला यांचे ओठ थर थर कांपत होते. तोंडांतून बरोबर शब्द फुटेना.

मोठ्या कष्टानें अडखळत अडखळत—अस्पष्टपणें मुलीच्या बापानं

अष्टवर्षा भवेत्कन्या पुत्रवत्पालिता मया ।
इदानीं तव पुत्राय दत्ता स्नेहेन पाल्यताम् ॥

ह्या मंत्राचा उच्चार केला. त्या वेळीं तिथें असलेल्या मंडळीच्या कानीं ते अर्धवट आणि घोगरे शब्द पडतांच त्यांच्या काळजाचें पाणी पाणी झालें. त्या विद्वान् व नैष्ठिक ब्राह्मणानें त्या निरपराध बालिकेच्या डोक्यावर आपले दोन्ही हात ठेवून मंत्रयुक्त अक्षता तीन वेळ टाकून तिला मंगल आशीर्वाद दिले.

हा सारा विधी नवऱ्या मुलाच्या नात्याच्या सर्व माणसांशीं, ह्मणजे नवऱ्या मुलाचा बाप, आई, वडील भाऊ, भावजया, बहिणी वगैरे प्रत्येकागणीक, झाला. मंत्र तोच ह्मटला जायचा, पण त्यांत नात्यापुरता तेवढा काय तो फरक केला जायचा.

सरतेशेवटीं नवऱ्या मुलाची पाळी आली. ह्या वेळीं मात्र मुलीला स्वाधीन करायची ती केवळ उपचारापुरतींच नसून खरोखरच त्यांच्या पदरांत घालायची होती. आजपावेतों न्हाऊन माखून जिला लहानाचं मोठं केलं; जिच्यासाठीं अनेक खस्ता सोसल्या; जिच्या आजारीपणांत रात्रीचा दिवस केला; जिच्या विनाकारण रडण्यानें देखील आईबापांच्या अंतःकरणांत कालवाकालव होई; जिच्या हंसण्यानें मन आनंदमय होई; जिचें अत्यंत

ममतेनें, काळजीपूर्वक लालन पालन व संगोपन केलेलं; जी केवळ आजपर्यंत जतन करून ठेवलेला त्यांचा जिवाचा अमोल ठेवाच; ती आज दुसऱ्याला द्यायची. इतःपर तिच्यावर त्याची सारी मालकी रहावयाची. मरेपर्यंत तिच्यावर स्वामित्व त्याचें. आपला कोरडा मायेचा संबंध—धर्मार्थ संबंध—राहायचा. ती एकुलती एक पोर. तिची ते सासरींही तितकीच काळजी घेतील व तितक्याच ममतेनं वागवतील असा मनांत आशातंतू बाळगून द्यायची. असला तो दुर्धर प्रसंग येऊन ठेपलेला ! ही सर्व स्थिति सर्वांच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. त्या बिचाऱ्या स्नेहबद्ध आईबापांची ती दीन दशा पाहून प्रत्येकाला कळवळा येऊन त्यांच्या डोळ्यांतून अश्रु गळूं लागले.

हा प्रसंग म्हणजे हाडामासाचा गोळा—नऊ महिने आपल्या आईनें आपल्या उदरांत कष्ट सोसून वाहिलेला—आंगचा तोडून दुसऱ्याला द्यायचा. शेवटीं निर्वाणीची वेळ येऊन ठेपली. पण तो विधी उरकायला आइबापांचें हात वाहीनात. त्यांचा धीर सुटला. चित्तवृत्ती क्षुब्ध झाल्या. त्यांच्या अंतःकरणांत होणाऱ्या वेदना—होणारें अत्यंत मानसिक दुःख—डोळयांतून अश्रुपूराच्या वाटे बाहेर मोठ्या जोरानें वाहत होतें. कोणीं त्यांना असें कां होतं म्हणून जर विचारलं असतं, तर तें कांहीं त्यांना सांगतां आलं नसतं. संसाराचा पाश तोडून वनांत ईशचिंतन करीत राहणाऱ्या कण्वासारख्या मुनीची देखील व्याकुल स्थिती झाली, तर आह्मी बिचारे संसारी लोक—आमच्या दुःखाला काय पारावार !

आणि साऱ्याच्या शेवटीं कापऱ्या हातानें—त्यांनीं आपल्या त्या लडिवाळ मुलीचे हात त्या आपल्या जांवयाच्या—भावी पुत्राच्या—हातांत दिले, तेव्हां त्यांना पोरासारखं ओकसाबोकशीं रडूं सुटलं. आतांपर्यंत इतका वेळ ज्याचा उच्चार केला तो मंत्र त्यांच्या तोंडांतनं फुटेना—स्फुंदस्फुंदून—तुटकतुटक त्याच्या तोंडांतून त्या मंत्राचीं अक्षरं थोडथोडीं बाहेर पडत होतीं.

अष्टवर्षा—भवेत्—कन्या——पुत्रवत्—पालिता—मया ।
इदानीं............स्नेहेन—पाल्यताम् !

प्रत्येक शब्दांत दुःखाचा आवेग दिसत होता. त्या दुःखाला राहून राहून पूर येई ! आणि त्या वेळीं असलेल्या मंडळींत असा कोणीही कठोर हृदयाचा नसेल, कीं हा हृदयभेदक प्रकार पाहून ज्याच्या अंतःकरणाला पीळ पडला नसेल ! ज्याच्या काळजाचें पाणी झालें नसेल ! ज्याच्या डोळ्यांतनं टिपं गळालीं नसतील !

जिकडे तिकडे अगदीं शांतता झाली. आणि एक पळभरानंतर एक मध्यम वयाची बाई तिथें आली व तिनं अगदीं कोमल सुरावर त्या शेवटच्या प्रसंगाला अनुलक्षून केलेलं असं एक गाणं म्हणायला सुरवात केली. तिच्या त्या गोड आवाजानं प्रत्येक जणाचं अंतःकरण अगदीं वेधून टाकलन्. तें गाणं इतकं सुंदर—इतकं हृदयभेदक—आहे कीं, तें ऐकून डोळ्याला पाणी यायचं नाहीं असं होणं अशक्यच ! अंतःकरणाला चटका लावून सोडणाऱ्या या गाण्याचं मी काल भाषांतर केलं. त्या वेळीं माझ्या डोळ्यांतनं सारखीं टिपं गळत होतीं.

# आईची विनवणी.

[ चालः–चंद्रकांत राजाची कन्या० ]

हात जोडते, पदर पसरते, परिसावी विनंती
माय मुलीची करिते बाई ! अपणालागीं ती ॥ ध्रु० ॥
प्रेमळ, सालस, थोर दयाळुहि, उदार, मृदु तेवीं
स्वभाव अपुला पूर्णपणें तो ठाउक मज बाई !
मातृहृदय परि असे खुळें हें, ऐकत मम नाहीं,
' नको ' ' नको ' मी म्हणतां वदवी मुखांतुनी पाही.
हा पोटींचा गोळा जिवलग जीवाचा ठेवा
तुमच्या पुत्राचा हा आतां–तुमचा तुह्मि घ्यावा !
बहु संतोषें देतें घ्या हा, सत्ता यापुढतीं
यावर तुमची असे सदाची—सरली अमुची ती !
अनन्यभावें किती प्रार्थिलें प्रभुजी देवाला
नवस नवसले किती तरी ते कुळस्वामिणीला !
प्रसन्न होउनि देव, देवि तशि, त्यांहीं मग दिधली
एकुलती ही धन्या कन्या, जणुं भक्ती फळली !
आजवरी इज जिवापलिकडे बहु संगोपियलें
मुखांतलाही घांस घालुनी प्रेमें वाढविलें.
हा प्राणांचा प्राण आज मी देतां अन्याला
हृदय कळवळे, मनहि तळमळे, हुरहुर जीवाला !
आंत आंतल्या कालवतें किति काहुर माजे तें
हृदयचि पळतें, काळिज तुटतें, मायचि जाणों तें !
कळी कोंवळी बहु लडिवाळें जोपासलि बाई !
देवाजीवर पूर्ण हवाला टाकुनियां पाही.

पाचारा तिज कोमल शब्दें, मायेची वाणी—
योजा तिजशी, हीच विनवणी परिसावी विहिणी !
गरीब गाईहुनी गरिब ही, हरिणीहुनि भ्याड
द्या सांभाळुनि अल्लड पोरिस, पुरवावें कोड !
कुणि रागाचा शब्द बोलतां, कीं रागें बघतां !
पोर भीतिनें गांगरते हो ! वचन नये वदतां !
अश्रू नयनीं ते डबडबती हो कंपित तनु ती
म्हणुनि याचितें योजा इजशीं प्रेमाची रीती.

साधी, भोळी, सरळहृदय ही निष्कपटी बाला,
आज्ञाधारक, लाजाळू बहु, शिकवावें इजला.
बुद्धि चांगली असे वयेची, हट्ट न तिज ठावा
जसा पाहिजे तसाच मोळा तिजसी लावावा.

सून आपुली साजायाला जें जें तिज यावें,
तें तें आपण तिज शिकवावें, शिकेल ती भावें.

नाजुक बाळा, मूर्त जिव्हाळा माझ्या जीवाचा
तसा विसावा प्राणांचा मम, निधि हा आशांचा
दूर आज मी इजला करतां मजला जें होई
आइच केवळ जाणिल सारें, केंवि कथूं बाई ?
माय मुलीची क्षणभर व्हा हो, माय–मुलीची माय
ठाव तरि दिसे मम हृदयींचा खोल किती हा जाय.

सुरबालेसम गोंडस बांधा बघतां हा नयनीं
आनंदानें सहज हृदय ये माझें किति भरुनी.
मंजुल गुंजित मम बालेचें पडतांना श्रवणीं
गमे गान जणुं सुरलोकींचें कोंदे या सदनीं;
याचपरी का तुम्हांस बाई ! कौतुक इजविषयीं

वाटलचि का? सांगा सांगा मजला लवलाही.
स्नेहातिशयें शंका येते, राग न मानावा
मातृमनींचा भाव सरळ तो आपण मनिं घ्यावा.
उदासीनता असो कशीही, दुःखहि कसलें तें
सहज स्मितमुख बाला बघतां सर्व लया जातें !
आनंदाची खाण मदीया, विश्रामस्थान,
तिच्या सुखांताचि माझें सुखही होय सदा लीन !
कधिं काळीं जरि अश्रू मजला दिसले तन्नयनीं
भडभडुनी मम काळिज येतें, सुचत नसे कांहीं !
याचपरी का तुम्हांस होइल सांगा हो विहिणी !
विहिणि न आपण, भगिनी माझ्या, सांगा मजसि क्षणीं.
पोर गुणांची, सालस मोठी, कधिं नच कवणाला
कथील अपुल्या वाचें बाई ' अमुक हवें मजला.'
तशीच सोशिक, दुःख न कवणा अपुलें सांगेल
सोशिल अपुलें आपण आंताचि तिळहि न दावील.
तिजसी बघतां सर्व मला परि अपोआप कळतें.
कळेल यापरि काय तुम्हांला बाइ ? ' कळो ' म्हणतें.
माळ गळ्यांतिल माझ्या बाळी, ताइत तिकडील,
प्राण बहिश्चर अमुचा आतां वियोग होईल !
मातेचा अवतार संपला माझा आतां कीं
तुम्हीच माता हिची यापुढें जाणावें लोकीं.
प्राण काढुनी देतें घ्या हा, सांभाळा त्याला
माय बाप गण गोत यापुढें सर्वचि तुम्हि इजला.
पायां पडतें, पुन्हां प्रार्थितें, बोला बोला हो
मम कन्येची माय व्हाल ना ? विहिणी सांगा हो !

“ झाली अमुची सर्वस्वीं ही, सांभाळूं इजला—
पोर पोटची जशी” वचन हें द्या या आईला.
दृष्टिपुढें मम सदा फिरे जी दृष्टीच्या आड
होइल आतां, क्षणांत जाइल संसारीं गाढ.
प्रेमळ बोलें ‘ बाळे ! ’ ‘ बाळे ! ’ घडि घडि दिनरजनीं
बाहत होतें लाडकिला मी, जाइल ती इथुनी.
परि जातां ही पाहुं कुणाला ? बाहूं कवणाला ?
देवा ! देवा ! जन्म मुलीचा कारण शोकाला !

* * *

ये, ये, बाळे ! जवळ लाडके ! धरुं दे हृदयाशीं—
कवळुनि तुजला गोरें मोरें कां मुख तूं करिशी ?
आजवरी जरि आई तव मी होतें वेल्हाळे !
या पुढतीं परि याच आई तुज समज बरें बाळे !
जन्माची मी केवळ माता, मी न खरी आई
सर्वस्वाच्या तुझ्या या पुढें माता या पाही.
निरोप तुजला देतांना ये कंठ अहा भरुनी
शब्द न फुटतो, आंतचि दबतो किति तरि अडखळुनी !
गेल्यावर तूं गजबजलेलें प्रेमसदन अपुलें
शून्यचि होउनि येइल खाया आम्हा हें सगळें !
हृदयांतिल या प्रकाश जाउनि भरेल अंधार
आशा लोपुनि घोर निराशा दिसेल चौफेर !
शून्य गृहाला, खिन्न मनाला प्रसन्नता कोण
आणिल बाळे ! गेल्यावर तूं अमुच्यापासून ?
कोंपऱ्यांत ती मूक होउनी वीणा राहील
हात फिरवुनी कोण तिजवरी गाणीं गाईल ?

कोण मुलींना बोलावुनियां गृहांत खेळेल
परोपरीचे खेळ खेळुनी हृदया रिझवील ?
अंगतपंगत कोण मुलींशीं करील आतां ती
झोंपाळ्यावरि घेउनि झोंके गाइल गाणीं तीं ?
तूंच लाडली, पाच, हिरकणी माझ्या जीवाची !
तुजविण दुनिया मजला वाटे ओस पहा साची.

ये ! ये ! झडकरि कवटाळूं दे ! दे चुंबन मजसी
एकाकी कशि तुजविण राहिन ? ठाउक देवासी !
दीनदयाळा ! प्रणतवत्सला ! द्यावें धैर्य मला
सहन कराया जगीं यापुढें कन्याविरहाला !
अतां सांगणें शेवटचें मम हेंच असे बाळे !
स्मृती असूं दे या आईची, अधिक न मी बोलें.
आंवर, आंवर, अश्रु लाडके !—

ही बघ तव माता—

बाई !—

विहिणी !—

भगिनी !—

इजसी सांभाळा आतां ! !

आपली,

कमला.





# पत्र २९ वें.



## पोकळडोक्यांचा झालेला बंडजाव.

प्रियकरा,—मला तरी आपली एक भविष्यवादीच समजायची. गेल्या शनवारींच मीं तिकडे पत्र टाकलं,—त्यांत केलेल्या कर्मांचीं फळं राजश्रींना मिळण्याच्या बाबतींत मीं लिहिलं आणि काल रवीवारींच मी लिहिलं त्याचा लागलाच पडताळा आला. गांवांत काल ज्याच्या त्याच्या तोंडीं ह्याच चर्चेचा विषय ! हें तरी एक भाग्यच ह्मणायचं नाहीं ? मी कालच लिहिणार होतें; पण ह्मटलं अगोदर बातमींत कितपत तथ्य आहे, ह्याची अगोदर खात्री करून घ्यावी, अन् मग पत्र टाकावें.

पोकळडोके–त्यांच्या रावसाहेबीला मी आतां रजाच देतें— शनिवारीं रात्रीं भेदरून बेदम होऊन पडले होते; त्यांचे केस कातरेलेल; मिशा वेड्यावांकड्या भादरलेल्या; हात बांधलेले; तोंडास चिखल नि शेण माखलेलें; जुन्या खेटरांची माळ गळ्यांत घातलेली; आणि त्यांचं असं नागवंउघडं ध्यान भर चवाठ्यावर एका कंदीलाच्या खांबाला साखळदंडानें करकचून बांधलेलं, व त्याला कुलूप ठोकलेलं. समोरच एक टोलेज़ंग इमारत असून, त्यांत विद्यार्थ्यांचें वसतिगृह असल्यानं स्वारीचं आदरातिथ्य होण्याची खाशी सोय झाली ह्मणायची ! अशा तऱ्हेची धिंडका

निघाल्याचं मीं पूर्वी कोठंस वाचलं होतं–कुठं तें नेमकं मला आठवत नाहीं–पण आजचा प्रकार त्याहून वरचढ !

त्यांतल्या त्यांत त्यांचं दैव कांहीं सुधं होतं ह्मणून त्यांच्या नात्यापैकींच एका विद्यार्थ्याच्या नजरेला हा प्रकार आला; त्या वेळीं उजाडलं नव्हतं. तरी त्यानं तसंच जाऊन एका सुताराच्या मदतीनं पोकळडोक्यांना त्या खांबापासून सोडविलं. मोकळे झाल्यावर न्हाव्याची मदत घ्यावी लागली. नंतर स्वारीनं नवे कपडे मागविले व पुन्हां थाट करून मिरवायला तयारच. पण काय? मिशा नाहींत ! तश्शी स्वारी कोर्टांत गेली. काम काज काय असणार ह्मणा ! पण झालेल्या प्रकाराचा विधिनिषेधच नाहीं ह्मणायचा ! दुसरं काय ? त्यांचा तो मेव्हणा भारी चौकस त्यानें हटकलंच स्वारींना याबद्दल ! त्यावर यांचा जबाबही आपला तयारच ! आपल्या मृत पत्नीच्या आठवणीसाठीं मिशांना रजा दिल्याचं त्यानं सांगितलन् ! कां आहे कीं नाहीं व्यक्ती पण व्यक्ती ! मी ह्मणतें माणसांनीं सारी लाज लज्जा कशी सोडली बाई ? ह्मणतो कसं ? नवं लग्न झालं आहेच, तेव्हां पुन्हां आतां नव्या मिशा फुटतीलच !

कितीही लपवालपव केली ह्मणून खरा प्रकार बाहेर आल्यावांचून राहणार थोडाच ? शेवटीं सारें बिंग बाहेर पडलंच ! जो येई तो आपल्या स्नेह्याला ही गोष्ट सांगे व ती गुप्त ठेवण्याविषयीं बजावून बजावून सांगे. तरी पहावें तों गोष्ट गांवभर पसरलेली. हें ध्यान विद्यार्थ्यांतल्या कांहीं मंडळींनीं पाहिलं होतं–अन् पुढची शोभाही पण त्यांनीं बघितली होती. त्याशिवाय झुंजुरका, तीन

झाडूवाल्या रस्त्यानं जात होत्या, त्यांची दृष्टी या ध्यानाकडे गेली. व त्यांनी याची आपल्या झाडणीनें चांगली संभावनाही पण केली! यावरनं एवढंच शिकायचं कीं, एकदां कां गोष्ट चार कानाच्या पलीकडे गेली ह्मणजे तिचा बोभाटा व्हायचा नसला तर त्यांपैकीं दोनच काय कान ते शिल्लक राहून बाकीची मंडळी मेली तरच काय ती सोय !

गरीब बिचारे पोकळडोके ! मला त्यांची पोटांतनं कींव–दया येते. पण हें कसं व्हायचं? 'करावं तसं भरावं' हा तर कायदाच आहे. केलेल्या कर्मांचीं फळं याच्या याच जन्मांत भोगल्यावांचून सुटका कशी व्हायची ?

आपली,
कमला.





# पत्र ३० वें.



## स्त्रीराज्य.

जिवलगा, गडे, खरंच, पुस्तक तर मोठं गमतीचं आहे. मीं तें अगदीं आरंभापासून शेवटपर्यंत सारं वाचून काढलें. अन् माझं तर बाई हंसू आवरतां आवरेना. शेवटीं पोट दुखायला लागलं, पण हंसं येतच होतं. कांहीं वर्षांच्या पूर्वींचें पाहिलेलं 'स्त्रीराज्य' कांहीं हें नाहीं. हें एक निराळंच पण अगदीं विलक्षण ठिकाण आहे. तें पुस्तक मी तिकडे आज सोबत पाठविलं आहे; तें वाचायचं अन् स्वतःची करमणूक करून घ्यायची. तिकडच्या वाचण्याजोगं आहे तें !

एकंदरींत पाहतां, या चमत्कारिक राज्यांत, राजे, त्यांचे दिवाण, न्यायाधीश, वकीलमंडळी, अधिकारीवर्ग,—झाडून सारे सरकारी नौकरच ह्मणाना—बाया आहेत. घरांतलीं कामं करायं आणि पोरंबाळं संभाळायपुरतंच काय तें काम पुरुषांकडे. त्यांतलं मुलं व्हायचं महत्वाचं काम मात्र बायकांनीं आपणा स्वतःकडेच ठेवलेलें आहे! अन् आपल्याइकडे जसं कांहीं कांहीं थोड्या बायकांना गोषांत ठेवीत असतात त्या सारखंच तिथें पुरुषांना गोषांत ठेवतात. ही पडदपोशी सोळाव्या किंवा सत्राव्या वर्षापासून सुरू व्हावयाची. ती पन्नाशी उलटेपर्यंत रहायची. कांहीं चांगल्या चांगल्या कुटुंबांत तर नवऱ्यांना तर भल्या जंगी लोखंडी पिंजऱ्यांतच अडकावून टाकतात ! गरीब घराण्यांतनं इतकी सक्ती दिसत नाहीं—कदाचित् तशी सोय नसल्यामुळेंही

असेल–पण इथें नवऱ्यांना निजायच्या खोलींतच अडकावून ठेवतात–तें सुद्धां बायांना कामाकाजासाठीं बाहेर जायचं असेल तेव्हां. हा विलक्षण प्रकार असण्याचं कारण, ते एवढेंच सांगतात कीं, अशानं ते बिघडण्याचा संभव नाहीं इतकंच नव्हे तर यानं नानाप्रकारच्या मोहापासनं त्यांना दूर ठेवितां येतं. आणखी याहून गम्मत ही कीं, पुरुषांना ह्मणण्यासारखं शिक्षणबिक्षण मुळींच दिलं जात नाहीं. नाहीं ह्मणायला कांहीं थोड्यांना त्यांच्या लहानपणीं मुलांच्या शाळेंत पाठविण्याचा प्रघात आहे. तिथें मास्तरणीच सारं शिकवितात. आपल्या इथें मुलींच्या शाळेंत आहे तसंच प्रत्येक मुलाला विवाहबंधनाच्या स्त्रीपुरुषांच्या पावित्र्याच्या बाबतींत नीतीशिक्षण दिलं जातं. या नियमाप्रमाणें नवऱ्यानं आपल्या बायकोला सर्वस्व मानून आणि आपल्या आयुष्यांतलें ध्येय 'राणीसाहेबांचें सुख' हें ठेवायला हवं. यजमानणीचं जेवण झाल्यावर त्यांच्या मागनं, अन् मग प्रेमानं ह्मणा किंवा आदर ह्मणून ह्मणा पण त्यांनीं जेवलेल्या पानांतच आपणही जेवायचें. त्या आल्या कीं खाडदिशीं उभं राहायचं तरी एका पायावर ताठ नव्हे हो! तर मान खालीं घातलेलं असं आणि यांत जर कां थोडीशी चूक झाली किंवा नीति-नियमाचं उल्लंघन झालं तर त्याबद्दल चांगलंच शासन मिळायचं. आणखी एक गोष्ट सांगायची राहिलीच. या विलक्षण मुलखांत बायकांनीं वाटेल तितकीं लग्न, नवरा जिवंत असतांना किंवा त्याच्या मरणानंतर लावावींत, त्याला पूर्ण मुभा आहे. पण नवऱ्यांना मात्र बायका मेल्यावर पुनः लग्न करायची परवानगी मिळायची नाहीं. विधुरांनीं आपल्या मिशा काढायलाच हव्याच; अन् जिथें कुठें मिशा नेहमींच काढायची चाल असेल त्या देशांत किंवा पंथांतल्या लोकांत त्यांच्या

नाकाच्या छेड्याला किंचितसं तासून काढतात. कांहीं झालं तरी डोकीच्या केसांना मात्र रजा मिळायची नाहीं. कारण पुरुषांना जर कांहीं शिक्षा करायची झाली, तर त्यांच्या झिंज्या धरून त्यांना चवदावें रत्न दाखवायला फार सोपं जातं.

खरंच, गडे, आहे कीं नाहीं हा चमत्कारिक देश ? माझ्या मनांत अगदीं विचारायचं आलं होतं कीं, देवाच्या-किंवा देवीच्या म्हणा-दयेनं,आह्मां बायकांना तुह्मां पुरुषांवर जर एवढा अधिकार गाजवायला सवड सांपडली, आणि स्त्रीराज्यांत होतं तसं, समजा आह्मीं आपल्या विरुद्ध जर तो आपला अधिकार गाजविला,तर पुरुषांतले कितीक जण तो सोसायला तयार होतील? ज्याप्रमाणें आमच्यांतल्या कित्येक अनाथ-निराश्रित-असहाय-बाया सध्यां आपल्या नशीबीं आलेला प्रकार सोसतात, तसं-तितक्याच शांतपणानं-आपल्या स्वतःच्या सुखाचा विचार एकीकडे ठेवून, मोठ्या थोर मनानं सोसायला, आपल्यापैकीं कितीसे पुरुष तयार होतील ? कितीजण-किती थोडी मंडळी-मोजकीच-मला त्यांचीही शंकाच आहे !

प्रियकरा, मी याच्यांत-यत्किंचित् कां होईना, पण अतिशयोक्ति केली-फुगवून लिहिलं-असं का वाटतं ? मुळींच नाहीं बरं ! रंगू एवढं मोठं तत्वज्ञान सांगत असते, पण तिला देखील बायकांच्या शोचनीय स्थितीबद्दल वाईट वाटतं आणि यांत-तिच्या भाषेंत हीं जीं किळसवाणीं पुटं चढलीं आहेत त्यांत-लौकरच सुधारणा व्हायला हवी आहे. तिचें तें वक्तृत्वपूर्ण भाषण अजून माझ्या डोळ्यांपुढें खेळत आहे.

आपली,

कमला.

---



# पत्र ३१ वें.



## स्वप्न.

प्रियकरा,—आपल्या या गेल्या पत्रांत जो प्रेमाचा पूर लोटला होता, त्यानं आधींच अस्वस्थ असलेलं माझं मन अधिकच पिसाळलं, आणि निराशेच्या खोल सागरांत मी बुडालें; पण माझी दैवरेषा सबळ; कांहीं तरुण गृहस्थांनीं सोडलेल्या तरीला माझे पाय लागल्यानें मी वाचलें. अन् काल तर मला वाटलं कीं, मी प्रत्यक्ष 'स्त्रीराज्यांतच' येऊन दाखल झालें आहें, पण तीच आज मी कुठें आहें बरं ? मला तर वाटतं कीं, मी जमिनीवर किंवा पाण्यावर नसून मधेंच हवेंत तरंगतें आहे; अन् विरल अशा वातावरणांत मी सारख्या धापा टाकतें आहे. शिव शिव ! यांतनं मला कोण तारील बरं ? प्रियकरा, जर कां हा प्रकार खरा असेल, तर तिकडे देखील मला वांचवितां येईल कीं नाहीं, याची आपली शंकाच येते. अन् हें खोटं तरी कसं व्हायचं ? आपल्याला जें स्वप्न पडलं त्यांतल्या बारीक गोष्टी दिखील नाहीं का खऱ्या ठरल्या ? मग माझ्या व्हायला कोणती हरकत आहे ? पण मला पडलेलं स्वप्न तिकडे सांगायला हवं. अन् मग तें खोटं पाडायची कामगिरीही तिकडेच सोंपविलेली बरी !

काल रात्रीं कानि, आपल्या या वरच्या गच्चीवर कसं खासं पिठासारखं स्वच्छ चांदणं पडलं होतं, तिथेंच मी निजलें. आंतल्या खोलींत कसं कोंडल्याकोंडल्यासारखं होत होतं, त्यामुळें मला तिथें बसवेचना. तशांत माझं आंगही कढत होऊन आलें असून डोकं कसं अगदीं तापून गेलं होतं. या कारणानं मला चांद-ण्याचा गारवा बरा वाटला, अन् तिथेंच मला चांगली झोंप लागली. मात्र फटफटायच्या सुमाराला एक अति विलक्षण असं स्वप्न पडलं. हा प्रताप माझ्याविषयीं इतका कळवळा आलेल्या त्या चंद्राचा का झोंपीं जायच्या आधीं त्या निळ्या भोर आका-शांत मला एक चांदणी दिसल्याचा भास झाला त्याचा, हें कांहीं मला सांगतां येत नाहीं. ती चांदणी माझ्याकडे पाहून डोळे मिचकावीत आहे—तें किती तरी वेळां पण ? अन् जसं कांहीं इतक्या दूर असणाऱ्या अंतरावरनं माझ्या कानांत कांहीं गोष्ट सांगूं पहात आहे; पण तिच्या ह्मणण्याचा अर्थ मला कांहीं लागेना, आणि तो काय असावा असा विचार मी आपल्या मनाशीं करीत असतांना त्यांतच मी झोंपीं गेलें. त्या झोंपेंत, शेवटीं शेवटीं जें का स्वप्न पडलें—अहाहा ! तें इतकं मजेदार, पण इतकं तापदायक अन् इतकं हुबेहुब होतं, कीं त्याचं वर्णन माझ्यानं करवत नाहीं.

प्रियकरा, मला सांगायचं तरी एकदां, माझ्या नशीबीं शेवट भद्राच कां लिहिल्या आहेत ? मला मारायचा का तिकडचा बेत आहे? आपण स्वतःच कां मला मारणार? स्वतःच? नुक्तंच ज्यांनीं प्रेमानं इतकं वेड होऊन मला पत्र लिहिलेलं—स्वतः त्यांनींच? छे! छे!

त्या स्वप्नानं मला जसं पिसाळून सोडलं आहे! कोण वेदना होतात तरी? इतकं अर्थपूर्ण व भयसूचक दिसतं आहे तें स्वप्न! प्राणेश्वरा, भगवान् श्रीकृष्णासारखं आपल्याला झाडावर बसलेलं मीं पाहिलं,आणि आह्मी वीस जणी भोंवतालीं जमीनीवर नाचतों आहोंत. साऱ्या जणी आपल्यावर भाळलेल्या, आपल्या प्रेमपूर्ण हांकेसाठीं जीव काढतों आहोंत—तळमळत आहोंत. पण कोणाचं केवढं मोठंही प्रेम स्वत:वर असलं, तरी आपलं प्रेम मात्र माझ्या खेरीज दुसऱ्या कुण्णावर नाहीं हें मला ठाऊक होतं.कारण आपण माझे—माझ्या स्वत:चे कृष्ण होतां. माझी खात्री होती कीं, आपल्या हांकेचा आनंद, मान किंवा अभिमान हा माझ्याचकरितां राखून ठेवलेला आहे. आणि कसा दुष्टावा पहा कीं, या उंच ठिकाणीं बसून बाकीच्या आपल्या सोबतिणींकडे कसल्या तुच्छ दृष्टीनें पहायचें, याचा मी आपल्याशींच विचार करीत होतें. पण काय सांगावं? इकडनं माझ्याकडे मुळींच लक्ष न देतां दोघा जोखायांना वर येण्याची खूण केली अन् त्या स्वत:च्या दोन्ही बाजूला येऊन बसल्या! हें का सांगायला हवं, कीं मी अगदीं हिरमुसली झालें. आंतून झाल उठली! बाकीच्या बायकांचं नृत्य चाललंच होतं. मी मात्र अगदीं बावचळल्यासारखी होऊन आपल्या त्या प्रेमांतल्या बायांकडे व स्वत:कडे हालचाल नसलेल्या एखाद्या निर्जीव पुतळीप्रमाणें पहातच राहिलें! पण सर्वांत वाईट गोष्ट ही कीं, माझ्या त्या लाडक्या पक्ष्यानें जी एकदम जोरानं किंकाळी फोडली, ती ऐकून झोंपेंतनं मी खाडकन् जागी झालें व स्वप्न तितकेंच राहिलें. काय सांगावं, माझा लाडका देखील इकडचा साथीदार

बनला अं? ह्यांत चांगलंच गौडबंगाल दिसतं–तरी पण या गौडबंगालांत कांहीं अर्थ भरलेला दिसतो.

प्रियकरा, आतां मला सांगायचं कीं, हें स्वप्न पाहून कोणालाही नाहीं का वेड लागायचं? छे! पुन्हां स्वप्न पडून त्यांतला राहिलेला भाग माझ्या नजरेला पडायलाच हवा! मी रोज रात्रीं त्याच जागीं निजणार आहें. मग चांदणं लागलं तरी बेहेत्तर. चंद्राची किंवा त्या ग्रहाची मी प्रार्थना करीन कीं, यांतला खरा प्रकार काय आहे तो त्यांनीं माझ्या नजरेला पाडावा! ते यांतलं इंगित-गुपित खास मला दाखवितील!!

पण खरंच गडे, मला सांगायचं तें. हें जें मला स्वप्न पडलं तें नुसता कल्पनेचा खेळच आहे, का लहानपणीं मी भगवान् श्रीकृष्ण आणि अनेक गोपिका यांच्या ज्या कथा ऐकिल्या त्यांचें केवळ प्रतिबिंब आहे? माणूस विचार करूं लागलं ह्मणजे पोरांच्या कानावर वाटेल त्या गोष्टी किंवा कथा, ज्यांत रूपकांचा आणि अलंकारांचा घोंटाळा उडवलेला आणि त्यांतच भल्याबुऱ्या गोष्टींची भेसळ केलेली, पाहून त्याला हा प्रकार किती खुळचट आहे हें दिसून येईल. खरोखर झाडाला वाचा फुटल्याचं, चांगल्या रूपवान् बायकांना फुलांचं किंवा बेडकांचं रूप दिल्याचं, राक्षस, भूतपिशाच, देवदूत व यासारख्याच काल्पनिक गोष्टी, त्यांच्या कानांवर पडूं देणं किती धोक्याचं आहे! बापड्या अर्भकांना इतकं ज्ञान नसल्यामुळें त्या खऱ्या वाटतात. मुलांना शिक्षण देण्याची ही मोठी मौजेची तऱ्हाच ह्मणायची! लहानपणीं खोट्यानाट्या, मनःकल्पित गोष्टींची संथा द्यायची, आणि त्यांच्या

कोंवळ्या मनावर बसलेलीं हीं पुटें पुसून ते पुढें मोठेपणीं खऱ्याखोटयाची पारख करणारे व सत्यनिष्ठ होतील अशी आशा करायची !

पण प्रियकरा, तें कांहींही जरी असलं, तरी मला इकडे एक प्रश्न विचारायचा आहे—तो आहे जरा खुळ्यासारखाच. खरंच मी आपल्याला आवडतें कां ? अन् माझ्या एकटीवरच का आपलं प्रेम आहे ? गडे, माझ्या मनांत तऱ्हतऱ्हेंचे जे तरंग येत असतात त्यांचं व मला जी भीति वाटते तिचं निरसन करायचं; आणि आपल्या या ' तर्कटी पोरीला ' मत्सरी ह्मणून तिच्यावर आरोप न यावा ! मी कांहीं दिवसांपूर्वींच, मत्सर ह्मणजे उच्च दर्जाचें प्रेम ह्मणून ह्मटल्याचं स्वतःच्या आठवणींत असेलच !

पण मी ह्मणतें, स्वप्न खरं असलं तरी मला त्याचा इतका हेवा कां वाटावा ? दोन, तीन, कधीं कधीं चार बायका केलेलीं माणसं नाहीं कां सांपडायचीं ? तरी माझ्या माहितींतल्या चार बायकांच्या दादल्यानें केलेला खुलासा मोठा सयुक्तिक दिसतो, आणि तो हाच कीं, मेल्यावर उचलायला चौघेजण मिळतील अशी आतां त्याची पक्की खात्री झाली ! कारण त्याचीं लांकडं स्मशानांत गेलेलीं ! आणि त्यानें प्रसंगविशेषीं मुर्दा उचलायला माणसं मिळायची पडलेली अडचण स्वतः डोळ्यांनीं पाहिलेली होती, तसंच भाडोत्री वाहक लावले तर त्यांचा बेसुमार लोभी स्वभाव—अन् जर का तो मुर्दा पैसेवाल्या गृहस्थाचा असला तर यांच्या लोभाला पारावारच नाहीं—असेही प्रकार त्यानें आपल्या डोळ्यांनीं पाहिले होते. पण गरीब बिचारा ! शेवटीं

त्याचा बेत फसलाच ! कारण प्रत्येक बायकोच्या नांवानं जरी त्यानं बरीचशी रक्कम आपल्या मृत्युपत्रांत लिहून ठेवलेली होती, तरी त्यांपैकीं दोघींनीं त्या कैदखान्यांतनं पोबारा केला आणि एका वर्षानेंच तो वारला आणि एवढ्या त्या अवधींत मेलेल्यांची जागा भरून काढायची कांहीं त्याची सोय जुळली नाहीं !

त्या भगवान् श्रीकृष्णाच्या सोळा हजार नायिकांचं आप-आपसांत कसं जुळत होतं याचं मला राहून राहून नवलच वाटतं. कदाचित् यांत माझा अप्पलपोटेपणा असेल, पण त्याला काय इलाज ? स्वतःच्या खांद्याशीं खांदा लावून बसणारी बया कोणीही जरी असली तरी मला कांहीं तें खपायचें नाहीं. मला तर तें जरा विलक्षणच वाटतें. यावर तिकडच्या स्नेह्यांमधनं ज्याला दोन बायका असून त्या गुण्यागोविंदानं एकत्र नांदत आहेत—अशानं जर प्रकाश पाडला तर सांगवत नाहीं. मला त्यांना देखील कांहीं थोडेसे प्रश्न विचारावेसे वाटतात. पण ते कांहीं गोड वाटण्याजोगे नाहींत; अन् इकडूनही त्याला खोडसाळपणाचं सर्टिफिकीट मिळा-यचं. हे मत्प्रिय प्राणेश्वरा, आपण माझे—माझेच रहा. हीं आपल्या देण्यासाठीं ह्मणून * * * आहेत,—चवीला अत्यंत मधुर !—भूकच लागली असेल तरी तिच्यासाठीं दुसरी तिसरीकडे मात्र दृष्टी टाकायची नाहीं !

आपल्यावर सतत प्रेम करणारी
व विश्वस्त असलेली,
**कमला.**

---



# पत्र ३२ वें.



## मनांतलें किल्मिष.

परमप्रिय हृदयेश्वरा,—त्या दिवशींचें तें स्वप्न पाहिल्यापासून माझ्या मनाला कसल्या यातना होत आहेत ह्मणून सांगूं ? जी गोष्ट पहावी तीवरनं माझ्या मनांतली भीति वाढतेच आहे, आणि येणाऱ्या शंका या दिवसेंदिवस बळावताहेत. काय असेल तें असो. गेल्या दोन महिन्यांपासून कीं नाहीं माझे ग्रहच फिरलेले आहेत. माझ्या जिवाच्या होणाऱ्या अपेष्टा—आणि सध्यां माझी झालेली हीन स्थिती पाहून त्या बापडयांचा अंतरात्मा संतुष्ट झाला असला पाहिजे !—का हें सारें स्वप्न खोटेंच; आणि नसत्या कल्पना मी आपल्या डोक्यांतून काढल्या—आणि निष्कारण आपल्या सुखांत माती कालवून घेतली. पण हें काय—याचा खुलासा करायला मीं आपल्यालाच विचारायचें ?—ह्मणजे वेड लागण्याला कसर ती काय राहिली ? संशयानं मला पुरं पछाडलं आहे ! कदाचित् ह्मणतात तसें भ्रमराच्या भीतीनें पछाडलेल्या आळीचें जसें मूळचें रूप पालटून तिला नवे पंख फुटतात—हें तिच्या तदाकारवृत्तीचें कार्य ह्मणून ह्मणतात—त्या सारखेंच तर माझें होत नसेल ?—तें कांहीं जरी असलं तरी सुखावर किंवा समाधानावर मला आतां पाणी सोडलेंच पाहिजे. कारण असें पहा कीं, एकदां का संशयानं मनांत आपला शिरकाव करून घेतला—हळूहळू त्यानें आपलें ठाणें

दिलें, कीं मग त्याला बाहेर घालवायचें काम फारच कठीण ! त्याचें शल्य सारखें मनाला बोंचत राहतें, अन् त्यानें झालेला व्रण बुजतां बुजत नाहीं. आणि कधीं काळीं बुजालाच तरी त्याचा शेष आपला कायमच. तो केव्हां चिघळेल याचा कांहींच नेम नाहीं.

प्रियकरा, नाहीं नाहीं त्या शंका माझ्या मनांत येतात हें मला दिसतं आहे. अगदीं साध्या-उघड गोष्टी पण त्या ढोबळ चुकाशा मला वाटतात. कनई ज्या आनंदाला वांटेकरी असतो त्याला लोक भलेही द्विगुणित झालेला आनंद ह्मणोत-पण मला तर त्यांचें हें ह्मणणें बाष्कळपणाचें वाटतें. ज्या आनंदाला वांटेकरी असतात तो अर्धवटच ! खरं ह्मटलं तर तो मुळीं आनंदच नाहीं. मी तर त्याला उघड उघड दुःख-काळजाला झोंबणारें विषच ह्मणतें.

प्रियकरा, आतां माझी कांहीं धडगत दिसत नाहीं. मला वाटतं मी अगदींच वाहवलें. हें पहा कीं नाहीं गडे, मी जर इकडलं मन दुखाविलं असेल तर त्याची मला क्षमा करायची ! तिकडच्या अंतःकरणांत मला थारा नसेल तर माझी कीव तरी करायची. आणि मी आहें तशीच हवी असलें, तर मग लागलीच येऊन मला भेटायचं. नाहीं तर माझी आशा सोडायची ! हें माझें असलं कलुषित झालेलें मनच मी स्वारीला घ्यायला धाडतें. गडे, यायचंच आणि घट्ट मिठी मारून मला वांचवायची ती !

आपली,

**कमला.**

---



# पत्र २२ वें.



## पुरुषांच्या आणाभाका.

पुन्हां तेंच ! रूपवान् बायको नवऱ्याला वैऱ्यासारखी, असा लोकांत बोभाटा आहे. पण ही कल्पना आधीं कोणाच्या डोक्यांत आली आणि कोणीं तिला ह्मणींत बसविलेन्, त्याचें कीं नाहीं मला मोठं नवल वाटतं. हें काम बहुशः पुरुषाचें, आणि स्वारीला एकच डोळा असावा. एखाद्या बायकोच्या रूपानं जर नवऱ्याचं वाटोळं होत असलं, तर नवऱ्याच्या पैशानं किती तरी बायकांच्या जन्माचें मातेरें झालें असेल ! पुरुषांच्या रूपाऐवजीं त्यांच्या पैशाकडे–हुद्याकडे–किंवा मानमान्यतेकडेच बायकांचें जास्त लक्ष असतें. असल्याच गोष्टीनें त्यांचे डोळे दिपून जातात आणि त्यालाच त्या भाळतात. ही गोष्ट खास कीं, वः ! छान ! प्रासाला प्रास कसा जुळला पण ? आणि यावरनं कडवेंही पण कसें नामी जुळलें. आतां लोकांनीं खुशाल ह्मणावं—

### पद.

[ चालः–" नागीण चपल" ]

नरजाति कपटि कुटिला ती
क्षणिकवृत्ती
असत्प्रीति
महशूर तियेची जगतीं ॥ धृ० ॥

क्षणीं सागरीं क्षणिं तत्तीरीं
क्षणीं यापरी क्षणीं त्यापरी
पुरुष न स्थिर कधिं असती ॥
स्वभाव यांचा–ती चंचलता !
ठाउक या नच एकनिष्ठता !
कां झुरतां मग त्यावरती ? ॥
दीर्घ उसासे कां हे देतां ?
दु:खी कष्टी कां हो होतां ?
ओळखा मनीं नररीति ! ॥

अग दुबळे, खुळे, लहरी स्त्रिये, त्वां आपल्या जातीला बट्टा लावलास !

आपली,
कमला.





# पत्र ३४ वें.



## बायकांनीं हातची सत्ता घालविली.

जगावर सत्ता कुणाची ? कनकाची का कांतेची ? आत्तां-पर्यंत ही सत्ता बायकांच्याच हातांत आहे असें मला वाटत होतें. कारण बायकांची जात निर्माण करतांना देवाच्या मनांत स्त्री व पुरुष यांना एकमेकांना सहाय व्हावें, प्रपंचाचा गाडा सुरळीत-पणें चालायच्या कामीं त्यांनीं मार्गदर्शक व्हावें हा हेतू होता. आणि खरं म्हणाल तर जगाचं सारं सूत्र बायकांच्याच हातांत आहे. पैसा हा तर तिच्या हातचा केवळ मळ—तिच्या तंत्रानं वागणारा—तिला खुष करण्यासाठीं—तिच्या प्रसन्नतेसाठीं—तिच्या पुढें नाचत असतो. शहाणपणा तिची मनधरणी करीत असतो. आणि मानीपणा व सत्ता तिच्या पायाशीं लोळण घालतात.

बायकांना कमी समजणाऱ्यांना—त्यांची योग्यता कमी लेख-णाऱ्यांना—त्यांच्या शक्तीचें खरें मर्मच कळलें नाहीं असंच ह्मणा-यचं. बैलाच्या शंभर जोड्यांना वेसण घालून आपल्या हातांत ठेवतां येईल एवढें त्यांच्या एका केसांत सामर्थ्य असतें. त्यांच्या एका थोड्याशा मृदु हास्यांत जगाला लोल करण्याचें सामर्थ्य असतें. एका अश्रुबिंदूनें जगांत भयंकर उलथापालथ होत असते. त्यांच्या प्रेमगंगेंत जग स्नान करून पुनीत होत आहे. त्यांतला आपलपोटेपणा—अनुदारता—इत्यादी खळमळ हीं सारीं या प्रवा-हांतील पवित्र जलानें नाहींशीं होतात. पण—

खरी स्त्री कोणती ? ब्रह्मदेवाच्या सोन्याच्या त्या वरच्या चकाकीला पाहून जिच्या मनाला कधीं मोह पडत नाहीं व जी सोन्याला विटाळ मानते, अशी बाई ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या या जगांत धन्य ह्मटली पाहिजे. तिच्या पायाचें तीर्थ घेतलें पाहिजे. पण अशा बायका आहेत कुठें ? जगांत पहावें तर जिकडे तिकडे साळकायामाळकायांचाच बाजार ! जी पहाल ती बाई आपल्याच तोऱ्यांत. पण तो त्यांचा तोरा—तो मानीपणा—पैशापुढें अगदीं दीन झालेला असतो. एरवींच्या या मिजासखोर बायका आमच्या त्या लक्ष्मीबाईपुढें दासीसारख्या—नव्हे बटिकीसारख्या—'जी' ह्मणून हात जोडून उभ्या. ज्या बायकांत मूळचें एवढें बळ—त्यांच्या हातांत जी एवढी मोठी सत्ता—ती सारी त्यांनीं आपल्या हातांनीं घालविली. लक्ष्मीबाईच्या हातांत दिली. जिकडे पहाल तिकडे पैसा ! त्याचा प्रभाव किती मोठा ! !

जिवलगा ! हें काय बरें मी असें भरकटत सुटल्यें? शिव! शिव!! मीं आतां अगदींच ताल सोडला. माझ्या बुद्धीला अगदींच कीं चळ लागला. संशयानं मला इतकं पछाडलन् कीं कोणचीही गोष्ट मला सरळ ह्मणून दिसतच नाहीं. माझें डोकें कामांतनं गेलं. यापेक्षां मला मरण आलेलं काय वाईट ? देवा ! नारायणा !! तूं कुठें लपलास बाबा ? मला आतां इथून घेऊन जा. ह्मणजे दुसरा जन्म तरी घ्यायला सांपडेल.

आपली,

कमला.



# पत्र ३९ वें.



## फिरून आणखी एक स्वप्न.

अग बाई! फिरून आणखी एक स्वप्न पडलें. अन् तें मागच्याहून चमत्कारिक. पहिलें पडलेलं स्वप्न पुन्हां एकवार पडावं ह्मणून मी चंद्राची व त्या ग्रहाची सारखी विनवणी करीत आहें. पण त्यांच्या हृदयाला अद्याप पाझर फुटलेला दिसत नाहीं. आणि तेंही बरोबरच आहे. या जगांत गरीबाची कींव करणारीं अशीं किती माणसं निघतील? मला वाटतं हाताच्या बोटावर मोजण्याइतकीं सुद्धां नाहींत–फारच विरळा. माझी मागणी एक आणि त्यांचं देणं दुसरं, यावरून तरी काय दिसतं? मला दुसरं स्वप्न पडलं; पण तें कसें? तें मागच्याहून जास्त भयंकर असें! जणूं काय मी त्यांच्या मागें लागलें ह्मणून मला चांगली शिक्षा लागावी!

स्वप्न असं पडलं कीं, जसा कांहीं सर्कशींतल्या मुलीच्या सारखाच मींही आपला पोषाख केला असून मला पंख उंचच उंच फुटले. आकाशांत उडत उडत मी थेट चंद्राकडे चाललें आहें. सारख्या भराऱ्या मारीत असतांही त्या आभाळाचा ठाव कांहीं लागतच नाहीं. शेवटीं ढग खालीं राहिले; मी त्यांच्या वर गेलें; खालची पृथ्वी अगदीं दिसेनाशी झाली. आंगांत हुडहुडी भरायला लागली; दांत वाजूं लागले. दृष्टी मंद पडली; चंद्रमंडळ

मोठंच मोठं दिसूं लागलं; आणि मीही पण मोठं रूप धारण करूं लागलें! शेवटीं मी अगदीं थकून गेल्यें, व माझा धीर सुटला, माझे पंख गळाले. आणि आतां आपलीं पुरीं शंभर वर्षं भरलीं असें मला वाटूं लागलें. पण काय चमत्कार पहा! मी देखील अगदीं थक्क होऊन गेलें. हलके हलके मोठ्या खुबीदार रीतीनें एखादी बाई जशी हातांत विमानाची छत्री घेऊन खालीं जमीनीवर उतरूं पाहते, त्याप्रमाणें उतरतां उतरतां शेवटीं माझे पाय एकदाचे जमीनीला लागले. माझ्या केसाला देखील धक्का पोहोंचला नाहीं. पण हा सारा कारभार झोंपेंतच! माझे पंख दिसेनासे झाले व पोषाख बदलला! इतक्या गमतीचा हा प्रकार असूनही माझ्या छातींत सारखं धडधडत होतं.

गडे मला सांगायचा याचा अर्थ काय तो! एवढं मोठं अधःपतन होऊन माझे राई राई एवढे तुकडे होऊं नयेत हें केवढें आश्चर्य? एवढं दुःख मला पूर्वी कधींच झालं नव्हतं. दुःखानं माझं काळीज उलूं पाहतं. सारखे दुःखाचे उमाळे येताहेत. अंतःकरणांत कोण कालवाकालव होत आहे ती! पण काय? आपल्याला नाहीं कांहीं ऐकायला येत?—फुटकं नशीब माझं!!

आपली,

**कमला.**





# पत्र ३६ वें.

## जगाची रीत !

छे ! माझा आनंद इतका कुठला टिकायला ! लहानपणीं मीं किती तरी बेत केले असतील ? त्या वेळचे ते रचलेले वाडे किती वेळ टिकले ? पळभरच ! या गेल्या दोन वर्सांत देखील मीं थोडया का टोलेजंग हवेल्या हवेंत उठवून दिल्या असतील ? दिसायला कित्ती कित्ती सुंदर म्हणून सांगूं ? पण मोठया फसव्या हो ! त्या साऱ्या एकदम कीं हो कोसळल्या ! त्यांच्या भयंकर दडपणाखालीं माझा चुराडा उडाला ! प्रारब्ध माझं. त्याला कोण काय करणार ? माझं सुख-स्वप्न पार वितळून गेलं. साऱ्या लोकांचा तळतळाट मला भोंवला ! ह्या मेल्या खोडर्या कपाळानं आपणा दोघांची, इतक्या लौकर ताडातोड केली. माझ्या सुखांत माती कालवलीन्. माझ्या हातनं मागल्या जन्मीं मोठं पाप घडलं असलं पाहिजे ! शिव्या अन् शाप –छे ! छे ! छे ! त्यांची नुसती आठवण झाली तरी आंगावर कांटा उभा राहतो ! काय आपल्या-कडचीं किंवा माझ्याकडचीं किती तरी माणसं आपल्या या संबंधाबद्दल वाकडं बोलत आलीं आणि अजूनही बोलत आहेत. ही जगाची रीतच आहे ह्मणा ! दुसऱ्याला पाण्यांत पाहणारें, कुत्सित स्वभावाचें, मत्सरी, कुटाळ अशा माणसांनीं भरलेलें हें जग ! संतापानं कसा माझ्या अंगाचा भडका उडतो आहे ! जसं एखाद्याला होमकुंडाच्या तोंडाशीं ठेवलं ह्मणजे होतं तसं मला होतं आहे. या असल्या ज्वालांत शेवटीं माझी राखरांगोळी खचित होणार ! ! !

आपली,

कमला.

## पत्र ३७ वें.

### मनाला बसलेला धक्का.

काय चमत्कार! उत्तरादाखल आपल्याकडून एक ओळ देखील धाडायची नाहीं ना? माझा जीव वांचवावा ह्मणून देखील एक अक्षरही लिहून धाडायला आपल्याला वेळ नाहीं ना? त्या मेल्या स्वप्नांत मला वेड लावलंन् त्याची ती चमत्कारिक हकीगत आपल्याकडे लिहून पाठवल्याला आज 'सहा' दिवस झाले असतील आणि मला लागलेला हा चळ आणि मनाला लागलेल्या इंगळया यांच्या बद्दल कमींत कमी पांच सहा पत्र गेलीं असतील. पण त्या बापड्यांचा काय उपयोग?

एकूण हें सारें जग नुसतें ढोंग, केवळ मायावी बाजार ना? खरे-पणा, सत्य, प्रेम, सुख वगैरे जगांत कांहींच का असूं नये? हें सारें नाटकच ह्मणायचें? न्याय अन्याय किंवा पाप पुण्य यांचा कांहींच विचार राहिला नाहीं? प्रत्येक गोष्ट पोकळ भ्रम, फसवणूक, केवळ भुताटकीचा खेळच समजायची का? आपलं आयुष्य नुसतं पोकळ फुगारा? केवळ अप्पलपोटेपणा—स्वतःचा मतलब—याशिवाय कांहींच नसावें काय? नुसता बाहेरचा देखावा आणि फसवेगिरी याच्या पलीकडे कांहीं नाहीं ना?

अग आई ग! हे क्लेश—ह्या यातना माझ्याच्यानं आतां अगदीं सोसवत नाहींत. विश्वास ठेवलेल्या ठिकाणींच केसानं मान कापली जावी ना? अंतःकरण कसं आंतून जळतं आहे. कशाचं हो! मी गेलें? झालें? मी कायमची जगांतनं उठल्यासारखीच!

आपली,

कमला.

## पत्र ३८ वें.

अगबाई ! कोण भयंकर देखावा तो !

शपथ ! थोड्या वेळापूर्वी, आपल्या घराच्या समोरच तें नारळीचें झाड आहे ना ? त्याच्या शेंड्यावर मी बसलें. आणि तीही त्याच्या पानांत अगदीं लपून. पहातें तों नारळीचें झाड हलके हलके वाढूं लागलें. वाढतां वाढतां शेवटीं डोकं आभाळाला लागलं. नंतर त्याला असा मौजेचा बांक आला कीं, पहावें तों त्याचा शेंडा आपला सरळच ! आपल्या घराच्या समोर येऊन दाखल होईपर्यंत हें झाड वांकतें आहे, ही गोष्ट माझ्या लक्ष्यांत देखील आली नाहीं. यांत काडीमात्र खोटं नाहीं. स्वतः स्वारी आणि जीवाभावाच्या त्या दोघी अप्सरा—जहागिरदारांच्या मुली, यांचें जें आपल्याशीं हितगुज—रहस्य—चाललेलें असतें, तें पाहून माझ्या अंतःकरणाचे तुकडे तुकडे झाले ! पण माझा शब्द फुटतो न फुटतो तों त्यापूर्वीच नारळीचं झाड सरळ झालं, व पुनः लहान होत होत त्यानें मला घरीं आणून पोहोंचविलें. मी हें सारें सांगतें आहें तें स्वप्नांतलें नाहीं हो ! त्या झाडावरनं मी नुक्तीच उतरलें असेन. आणि माझ्या हातावरचे ओरखाडे अद्याप दिसताहेत. त्याबद्दल शंका घ्यायचं मुळींच कारण नाहीं. अगदीं—अगदीं नको घ्यायला. इकडची सारी कृति मीं पाहिली ! त्या अप्सरा कोणी दुसऱ्या तिसऱ्या नव्हत. स्वारीबरोबर—प्रभु कृष्णाबरोबर कदंब वृक्षावर विहार करणाऱ्या त्या वेडावलेल्या—अनुरक्त—गोपीच! त्याच त्या—अगदीं खरं. यांत तिळमात्र खोटं नाहीं. माझं दुर्दैव ओढवलं अन् काय !

आपली,

कमला.



# पत्र २९ वें.



## वेडाची लहर !

प्रियकरा,—मी अद्याप इकडे 'प्रियकरा' याच नांवानें संबोधितें. जरी मी आपल्याला आवडेनाशी झालें आहे, तरी आपण मला पूर्वीप्रमाणेंच आहांत.गेल्या ३।४ दिवसांत मी आपल्याला कांहींच लिहिलं नाहीं. कारण इतकंच कीं, आजकाल माझं जग, माझे सोबती, माझी वागायची रीत, हीं सारीं वेगळींच आहेत. पण काय करूं हो !—पुन्हां लहर येण्याचं चिन्ह दिसत आहे. या खेपेला बरीक मला पक्कं वेड लागेलसं वाटतं. पुन्हां शुद्धीवर येण्याची आशा दिसत नाहीं. देवालाच आतां माझी काय कींव येईल ती खरी ! इतर साऱ्या गोष्टींपेक्षां त्या लहरीचीच मला भारी भीती वाटते. असल्या या भ्रमिष्टपणांत जन्म घालविण्यापेक्षां मरण आलेलं पुरवलं. केवढी मी पापीण ! अंगांत शक्ती आहे तोंच मी जीव देऊं काय ? त्यापासून माझ्या जीवावरचं केवढं दडपण दूर होईल ? एवढ्या गोष्टीची जर मला खात्री असती कीं—' मेलं कीं गेलं '- कायमची कटकट चुकली—या जननमरणाच्या फेऱ्यांतून सुटका झाली—किंवा हेंही होत नसलं तर निदान जी काळझोंप इथें लागली, ती फिरून उघडायची ती अगदीं उशीरा लांबच लांब गेल्यावर—या घाणेरड्या जगापासून—त्याच्या

वाऱ्याचाही स्पर्श होणार नाहीं इतक्या अंतरावर-अरुंधतीच्या चांदणीइतक्या अंतरावर–तिथें ! वा ! असें जर कां झालें तर मग काय ? मग या जिवाची इतकी मातबरी कोण मानणार ? मीं तर एखाद्या खेळण्यासारखं पार झुगारून दिलं असतं ! पण तेंच मेल्यानंतर जर का डुकराच्या किंवा कुत्र्याच्या–मांजराच्या–द्वाड–अपेशी मांजराच्या जन्माला यायचं असलं तर मग–अहंः ! एवढयाच करितां–मला विचार पडतो. हे सर्वशक्तिमान् प्रभो, माझ्यासारख्या दुबळीचा आधार काय तो तूंच. तूच माझा वाली. माझी सारी दार मदार केवळ तुझ्यावर !

आपली,

कमला.



# पत्र ४० वें.



## दुश्चिन्ह !

कसलं मेलं सत्यानाशी मांजर ! पुन्हां आपलं तयारच ! सारखें माझ्या मागें हात धुवून लागलेलें आहे ! आज मोठ्या पहांटेस मी बिछान्यावरून उठतें न उठतें तों पहिल्या प्रथम इचं दर्शन ! झालं ! वाईट गोष्टीचा पडताळा यायला कितीसा उशीर? इकडनं मोठ्या आवडीनं द्यायची झालेली, ती माझी आवडती–जीव कीं प्राण–अशी आंगठी ती कुठें पडली नकळे! तिच्यासाठीं मी सारं त्रिखंड शोधलं असेल ! पण ती गेलेली वस्तु कुठली सांपडायला ? अन् असंच असतं तर मग ती हरवलीच कशाला असती ? आज इतके दिवस झाले, तिला कधीं धक्का लागला नाहीं, अन् आजचं काय झालं ? वस्तु क्षुल्लक असेल ! पण तिच्यावर माझा इतका जीव बसलेला होता कीं, ती गेल्यापासून माझ्या डोळ्यांचं पाणी खळलं नाहीं. या दुश्चिन्हापासून माझ्या मनाला सारखी रुखरुख लागलेली आहे ! कांहीं गोडच लागत नाहीं ! ! काय असेल तें असो, एक वेळ देखील या द्वाड मांजराचा पडताळा चुकला नाहीं ! न जाणों, आणखीन् काय काय ओढवणार आहे तें ! ! कुणास ठाऊक ? माझं काळीज थरथर कांपतं. पण मी ह्मणतें, त्याला तरी मी दावेदार ह्मणून कां ह्मणावं ? यापेक्षां मी त्याला आपला हितकर्ता कां ह्मणूं नये ? कारण तो वेळेवर जागं करणारा स्नेहीच ह्मणायचा. आणखी बोल जर लावायचाच असला, तर तो आपल्या कृतकर्माला किंवा प्रारब्धालाच लावलेला बरा !

आपली,

कमला.



# पत्र ४१ वें.



## शेवटीं त्यानेंही दगा दिलान् !

प्राणेश्वरा, काय सांगू ?—आतां दुःखाचा केवळ कडेलोट झाला. माझा लाडका मला सोडून गेला ! त्या माझ्या गोड गंग्यानं पिंजऱ्यांतून पळ काढलान् ! त्या गोष्टीचा नुसता विचार मनांत आला कीं, मला वावचळल्यासारखं होतं. इकडच्या दर्शना-शिवाय माझ्याच्यानं एक पळभरही धीर धरवत नाहीं ! मागचं सारं विसरून एकदां यायचंच आणि आपल्या बाहूंनीं मला कव-टाळून या माझ्या कावलेल्या मनाला शांतता द्यायची कशी ! डोकं अगदीं भणाणून गेलं आहे. आज जसा मनांत गोंधळ उडाला आहे, तसा यापूर्वी कधींच उडाला नव्हता. किंवा मनाला इतकी खिन्नताही पण यापूर्वी कधीं आली नव्हती. अहो, असं काय करतां बरं ? कांहीं तरी दया येऊं द्या ! थोडीशी तरी माझी आपल्याला कींव येऊं द्या. नुसतं येऊन एकवार आपल्या प्रिय-करणीचं चुंबन घेतलंत तरी पुरे ! ती मागच्या साऱ्या गोष्टी पार विसरून जाईल व तुमच्यावर आजन्म प्रेम करील ! गडे याच ! पुरी भ्रमिष्ट होण्याची वाट पाहतां कीं काय ? वेळ निघून गेल्या-वर मग येऊन काय उपयोग ? कसेंही करा आणि याच !

आपली,

कमला.



# पत्र ४२ वें.

## अखेरचा तडाका !

हूं: ! शेवटीं आपलं पत्र एकदाच आलं. किती दिवसांनतर आलं तें ? कारण आपण फिरतीवर होतां ना ? बरं, पत्र धाडलं तें तरी कशा प्रकारचं ?—अगदीं अळणीं—मिळमिळीत ! मीं त्या तोंडपाठ करून ठेवलेल्या पूर्वीच्या पत्रांत व याच्यांत केवढा फरक ? माझं स्वप्न तर आपण अगदीं वरच्यावर उडवून दिलंत कां ? मीं ज्या शंका घेतल्या, त्यांच्या मुळाशीं आपल्या मतानं मीं कवितेचं छत उभारलं, हें आहे ! ठीक ! हें ह्मणायला इकडे धीर बरा झाला ! ! शिव ! शिव ! मी मरायला टेंकलेली—तीही केवळ आपल्याकरितां—अशा वेळीं माझ्यावर हा आपला आरोप अं ? कोण निष्ठुरपणा हा ! इकडचा अवतार मला मारण्यासाठींच का झाला ? आणि मारणें हा आपला सारा खेळच ना ? १०।१५ दिवसांत खास येतों ह्मणून जें लिहायचं झालं तें कशाकरितां आणि कोणासाठीं ? आपल्यावर असलेल्या माझ्या प्रेमाचं आपल्याकडून हें मला चांगलेंच बक्षीस मिळालं ह्मणायचं ! आपण एकत्र असलेल्या स्थितींत जे दिवस घालविले, ते किती सुखांत गेले !—छे ! तो सारा भ्रम ! तें केवळ स्वप्न! त्यांतून मी आतांच जागी झालें. मला वाटलं कीं, मी आपली बांधलेली आहे. पण इकडून मला मोकळं केल्यापासून माझ्या त्या लाडक्यासारखं मला आपण हवं तिकडे जायची मोकळीक दिलीत. देवा नारायणा, आतां माझी तुला एवढीच प्रार्थना आहे कीं, मला तूं आत्तां—या क्षणीं येथून ने कशी !—आणि आपल्या चरणाजवळ मला ठाव दे ! झालं, माझं या जगांतलं कार्य संपलं. मी साऱ्या बंधनांतून मोकळी झालें.

आपली,

कमला.



# पत्र ४३ वें.



## सन्निपात.

हे पहा यमाचे दूत मला नेण्यासाठीं येऊन उभे आहेत. त्यांपैकीं एकजण कसा शरीरानें चांगला धिप्पाड, दाढीवाला, हातांतलें जाळें उघडून मला आंत ओढायची तयारी करतो आहे ! काय असेल तें असो—मला वाटतं त्याच्या डोळ्यांत जी मोहिनी भरलेली आहे तिनं माझं तर मन त्याच्याकडेच चुंबकाप्रमाणें ओढतें आहे. मला आज कित्ती तरी बरं वाटतं आहे ! माझीं सारीं बंधनं आजपासून मोकळीं झालीं. जे माझ्या जीवाचे आधार—माझे स्वामी—त्या माझ्या जीवितेश्वरांनीं माझा त्याग केला. तिकडच्या नांवाचा पक्षी ज्याला मी प्राणापलीकडे जपलें, त्यानं मला याच वेळीं दगा दिलान्. माझ्याविषयीं ज्यांचं काळीज तुटतं अशा त्या चंद्राचें दर्शन उभ्या रात्रींत मला घडलें नाहीं; आणि ज्या तान्यावर—ग्रहावर माझी एवढी भिस्त तो पहातें तो काल त्याचाही पत्ता नाहीं. तारामंडळांत कुठें लपला देव जाणे. झालं—माझी वेळ भरली. हे पहा हे यमाचे दूत आपल्या पाशांनीं मला जखडायला लागले. येतें. आई वसुंधरे येतें—येतें बरं—कोणी बोलल्या चालल्याचा राग मानूं नका—ह्मटलं मी येतें—आपलं गोड नांव—कृष्ण—देवाचें तें—चाललें.

आपली,

कमला.

# शेवट.



याप्रमाणें माझ्या अत्यंत जिव्हाळ्याची सोबतीण—मैत्रीण—अतिशय प्रेमळ अंतःकरणाची, लाडकी कमला मला असून नसल्यासारखीच झालेली आहे; आणि या आपत्तींत आणखी भर पडावयाला, फार दूर अशा ठिकाणीं, मला माझ्या कामावर रुजू व्हावयाला जावें लागत आहे. शिवाय मीं जी बऱ्याच दिवसांची सुटी घेतली होती तीही आतां संपलीच. याशिवाय आणखी दुसरी आपत्ति—भरीला भर ह्मणून पडलेली आहे, ती मीं आपल्याला सांगितली तर आपण मला उद्धट तर नाहीं ना ह्मणणार? मागें आलेल्या पत्रांत—ज्यांचा दोन अप्सरा ह्मणून पूर्वी निर्देश झालेला आहे त्यांपैकीं एकीचे यजमान-दीड शहाणे, ज्यांना मी केवळ बंधूप्रमाणें मानीत आलों आणि त्यांच्या अडचणीच्या वेळीं मी उपयोगी पडलों ह्मणून ज्यांच्या मनाला कांहीं वाटावयाला पाहिजे त्यांच्यांत एकाएकीं गूढ अशा वेडाचीं चिन्हें दिसायला लागलीं व ते मला अगदीं परक्या माणसासारखे लेखूं लागले! पण सर्वांहून अत्यंत मर्मभेदक गोष्ट ह्मणजे मी त्यांच्याशीं दगलबाजी केली असा त्यांना संशय आला व त्यामुळें त्यांचें डोकें फिरलें, असें कांहीं उलट्या काळजाचे पाजी कुटाळ लोक ह्मणत आहेत. व याप्रमाणें नस्ता संबंध ते जोडूं पाहतात. हे दयाघन प्रभो, तुझ्यापासून लपलेलें असें काय आहे? कांहीं नाहीं! तरी पण परस्परांच्या अंतःकरणाची ओळख पटविण्याचें सामर्थ्य त्वां आम-

ऱ्यांत कां ठेवलें नाहींस बरें ? पण कदाचित् तें नसल्यामुळेंच माणसें सुखांत असतील ! हा जगांतील खुळ्या पुरुषांचा आणि दुबळ्या बायकांचा बाजार ! यांत किती वेळां खऱ्या अंतःकरणाचीं माणसें केवळ क्षणिक स्वार्थाला बळी पडून ज्या सुखाच्या शेवटीं नरक ठेवलेलाच अशा त्या विषयसुखालाच सर्वस्व मानतात. परमरमणीय व सुंदर अशा हृदयेश्वरी,—लाडके कमले, देवता तुझें संरक्षण करोत; आणि त्यांच्या कृपाप्रसादानें तुझी प्रकृति पुन्हां ताळ्यावर येऊन तुझ्या सहवासांत तुझ्याशीं सर्वकाल प्रेमबद्ध झालेल्या

या सेवकावर—

कृष्णावर

आपल्या कृपेची पांखर घालोत !



# उपसंहार.



वाचक हो ! हें सारें नुसतें स्वप्न असणें शक्य आहे काय ? मला तरी हें अशक्यच दिसतें. कमलेवर आणि तिच्या त्या विलक्षण पत्रावर माझा स्वतःचा पूर्ण विश्वास आहे. इतकेंच नव्हे, तर या गूढ–अज्ञात अशा नायिकेचा–जिच्याविषयीं मला पूर्वींहून अधिक आदर वाटतो–तिचा अजूनही शोध लागेल असा माझा दृढविश्वास आहे. तसेंच या पत्रांतून जीं नानाविध पात्रें–ज्या मूर्ती तितक्या प्रकृति आलेल्या आहेत, त्यांपैकीं बऱ्याचशा–निदान कांहीं थोड्याशा तरी–व्यक्ती माझ्या जुन्या ओळखींत किंवा स्नेह्यांत नसतीलच असेंही पण मला ह्मणवत नाहीं. हे सौंदर्यशालिनि कुसुमश्रेष्ठ कमले, त्या गोड नांवाचा व तुझ्या त्या लेखणींतून निघालेल्या मधुर अशा फलांचा आस्वाद घेण्यास मीं जें हें धाडस केलें त्याबद्दल मला तूं उदार मनानें क्षमा कर ! कारण मी अगदीं मनापासून तुझ्याबद्दल देवापाशीं करुणा भाकीत असून त्या माझ्या प्रार्थनेचा उपयोग झाला असा माझा समज आहे. कल्याणमयी कमले, तूं सुखी ऐस ! आतां यापुढें हा आडपडदा माझ्याच्यानें राखवत नाहीं.

